# हीच मुलीची-आई




लेखिका—सौ. गिरिजाबाई केळकर.

श्री.

# हीच मुलीची-आई



लेखिका


**सौ. गिरिजाबाई केळकर**

( पुरुषांचें बंड, आयेषा व राजकुंवर या नाटकांची कर्त्री. )





मुद्रक व प्रकाशक,

**कालिदास सिताराम पंडित**

मालक समर्थ छापखाना, धुळें.





**आवृत्ति पहिली.**





किंमत ६ आणे.

# —मनोगत—



काहीं वर्षांपूर्वी मीं '**मुलींच्या आईचा**' प्लॉट तयार करून लिहायला घेतला, पण निरनिराळ्या अडचणींमुळें तें तसेंच राहिलें. परवां जेव्हां मनोहर स्त्री संगीत मंडळी येथें आली, ते वेळीं कंपनीचे उत्साही मालक रा. '**बाबासाहेब चिवटे**' व येथील नागरिक रा. **भय्यासाहेब देशपांडे** यांच्या आग्रहावरून ही नाटिका मी परत लिहायला घेतली. विषय अगदीं रोजच्या व्यवहारांतलाच आहे हल्लीं सामाजिक नाटकांचा काल आहे, समाजांतही कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्या समजून सांगायला गेलें, तरी पटत नाहींत, पण त्याच गोष्टी जर दृश्य स्वरूपांत पुढें आल्या तर बरेंच वेळां मनाला पटतात आपला अगदीं अवतार असला, आणि दुसऱ्यानें अवतार म्हटलें, म्हणजें राग येतो, पण तोच आपण आरशांत पाहिला, म्हणजे पटून आपण नीट नेटकें रहावयाचा प्रयत्न करितों, तीच गत ह्या '**आईची**' आहे. शिवाय समाजांत बायकांच्या रोजच्या व्यवहारांत कशा कुचंबणा होतात, त्याहि पुरुष व्यक्तीच्या दृष्टीला येतील. या बाबत कांहीं वाटलें तर विचार करावा; नाहींतर रमाकाकूंच्या फटकळ तोंडानें थोडावेळ आपली करमणूक करून घ्यावी आणि हसावें, अशा विचारानें ही नाटिका लिहून रसिकापुढें ठेवीत आहे.

नाटिकेंत घालावयाचीं पदें, कंपनींतील गाणाऱ्या नटांच्या आवडीच्या रागांतील हवीं, म्हणून नव्या चाली सुचविण्याची मदत जशी कंपनींतील पेटीवाले रा० **अडगांवकर** ह्यांनीं केली, तसेंच आमचे चि० **बाबूराव दीक्षित** यांनीं माझे बदली पेटीवाल्याशीं काम करण्यांत मला जी मदत केली, त्या बद्दल मी त्यांचीही आभारी आहें. **समर्थ छापखान्याच्या मालकांच्या** हौशीमुळेंच तर ही नाटिका इतक्या लवकर छापून बाहेर आली, त्यामुळें त्यांचीही आभारीच आहे.

श्रावण शु० १ शके १८५४<br>धुळें. ता० ३।८।१९३२

लेखिका—<br>**सौ० गिरिजाबाई केळकर.**

# हीच मुलीची-आई

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

[ विद्यार्थ्यांची अभ्यासाची खोली, शेल्फ, पुस्तकें, टेबल, खुर्ची, बापू टेबलावर पुस्तकांत डोकें खुपसून बसला आहे व दरवाजांत लक्ष्मी उभी आहे. ]

**लक्ष्मी**—( स्वगत ) काय, नशिबाचा चमत्कार आहे पहा, दोन वर्षांपूर्वी मी सुखाच्या शिखरावर बसलें होतें. आईबापांच्या प्रेमळ छत्राखालीं खाणं पिणं नी मजा मारणं, हाच काय तो माझा व्यवसाय होता. माझी आवड, माझं सुख दुःख व माझी करमणूक, याबद्दल, इतर लोक विचार करीत असत. त्यावेळीं माझी तब्यत लवकर खूष होत नसे. माझ्याकरितां दुसऱ्यांनीं केलेलं मला थोडं वाटत असे, पण आतां काळ पालटलेला आहे. आज दोन वर्षे माझ्या लग्नाला झालीं, पण एकंही दिवस सुखाचा जात नाहीं. स्त्रियांच्या आयुष्यांतील मुख्य दैवत जे पती, त्यांची आणि माझी चुकूनच गांठ पडायची. या मुख्य दैवताला खूष ठेवण्याकरितां, जीं इतर उपदैवतें खूष करायचीं असतात, तीं इतकीं खडतर आहेत कीं, कितीही तपश्चर्या केली तरी प्रसन्न होणं कठीण. अशा या बिकट परिस्थितींत मी माझ्या आयुष्याचे दिवस कसे बरं काढूं! परमेश्वरा... ........

#### पद

[चाल—हृदया प्रिया...अशी देवता—]

। शरणांगता प्रभु तारिता । तुजवीण त्राता न मजला अतां ।
। तूं दीन बंधूहि । विगलीत गति मी ।
लव न सुख मज । दिसत आतां । दयाळा ॥
। कळोनी तुझी दिव्य गुणशीलता । शरणांगता—प्रभुतारिता ॥

( लक्ष्मी बापूच्या खुर्ची जवळ जाऊन ) का ! आज माझ्याशीं नाहीं का बोलायचं ? मी एथें केव्हांची उभी आहे, मला चट्दिशीं गेलं पाहिजे. नाहीं तर सासूबाई अगर वन्सं पहातील.

**बापू**—मग तूं कशाला आलीस ? आईनं पाहिलं तर किती अनर्थ होतील, ठाऊक आहे ना ?

**लक्ष्मी**—असं काय बोलायचं ते ? असं बोलायचं होतं, तर लग्न कशाला केलं ! लग्नाची गांठ बांधून आम्ही या नव्या घरीं येतो, तें नवं प्रेमाचं मनुष्य जोडाण्या करतांना ? नव्या प्रेमांत, जुन्या प्रेमाचा विसर पडतो. पण मीं इथं आल्या पासून, आपली कधीं गांठ पडत नाहीं आपले विचार कळत नाहींत, घरांत चाललेली परिस्थिति आपल्याला कळते कीं, नाहीं ते समजत नाहीं सासूबाई, वन्सं यांना खूष ठेवण्याकरितां मी किती भगिरथ प्रयत्न करीत असंत, पण ते सारे फुकट जाऊन, उलट मी नीट वागत नाहीं, म्हणून माझी अडवणूक म्हणण्यापेक्षां ज्याला छळणुक म्हटल्यासच अधिक शोभेल, ती सुरूच आहे. या अशा जखमा, पतिप्रेमाच्या मलमपट्टीनंच बायका सोशीत असतात, तरी आपलं मन मला समजेल का ?

**बापू**—मन काय समजायचं ! आईचं सूख तेंच माझं सूख. आईची आज्ञा तेंच माझं व्रतपालन ! मग तें कितीही कठोर असो.

**लक्ष्मी**—आईची आज्ञा पाळूं नये, असं कोणी तरी म्हणेल का ? सासूबाईना खूष करूं नये, असं कोणत्या तरी सुनेला वाटेल का ? पण हें करताना देखील आपली प्रेमळ दृष्टी, आम्हांला दिसूं नये का ? आपल्या एखा-द्याही गोड शद्बाची आम्हीं अपेक्षा करूं नये का ?

**बापू**—अग, या सगळ्या कादंबऱ्यांतील कल्पना आहेत ! मला वाटतं तूं पुष्कळशा कादंबऱ्या नाटकं वाचलीं असावीस.

**लक्ष्मी**—( हसून ) मग व्यवहार तो कसला असतो ! नाटकांत काय दाखवतात ! कादंबरींत वर्णनं कुठलीं करतात. वर्णनाची अतिशयोक्ती असते, असं धरून चाललं तरी, नाटकं, कादंबऱ्या प्रमाणें व्यवहारांत स्त्रीपुरुषांचीं लग्न होतात, ही गोष्ट खरी ना !

**बापू**—हें बघ, मला तुझ्याशीं वाद विवाद करायचा नाहीं. मला एकच कळतें, आईला दुखवायचं नाहीं, तिची आज्ञा मोडायची नाहीं, मग तेवढ्याकारतां वाटेल तो स्वार्थत्याग करायला माझी हरकत नाहीं.

**लक्ष्मी**—पण असं कोण म्हणेल कीं, त्यांना दुखवावं ! पण त्यांना न दुखवतां देखील, दुसऱ्याशीं सरळ बोलतां येत नाहीं का ?

**बापू**—पण मी तुला एकदां सांगितलं ना ! कीं, मला वाद-विवाद करायचा नाहीं म्हणून !

**लक्ष्मी**—बरं, पण आज सत्यनारायणला तरी आपण येणार ना ? मला आतां जायला सासूबाईनी परवानगी दिली आहे. पण म्हटलं जातांना भेटून तिकडे येण्याबद्दल एकदां आग्रहानं सुचवून जावं ! म्हणून संधी साधून आलें. मग येणार ना ? येणार ना तर ! आईबाबांना बरं वाटेल !

**बापू**—पण माझ्या आईला काय वाटेल, याचा विचार केला पाहिजे, ( पडद्यांत-बापू, अरे बापू, बापू अशा हाका ऐकूं येतात. )

**विठू गडी**—( तोंडानं मोठ्यानं बडबडत प्रवेश करतो. ) लक्ष्मी कुठं हाये ! लक्ष्मी. लक्ष्मी कुठं गवसना ! ( लक्ष्मीकडं पाहून ) बाईसाब हाक मारत्यांती. ( हातानं लक्ष्मीला जा म्हणून खुणावतो व बापूस गपबस म्हणून सांगतो. मोठ्यानं लक्ष्मी कुठं आहे म्हणून ओरडतो— ( लक्ष्मी जाते. )

**रमाकाकू**—( प्रवेशून ) विठू, विठ्या, इथं कायरे करतोस ?

[ विठू खुर्ची, टेबल शेल्फ यांच्या मागं केरसुणी शोधायचा धुभाकूळ घालतो ]

**रमा**—विठ्या काय रे करतोस ?

**बापू**—अरे ! माझीं पुस्तकं काय म्हणून हिकड तिकड उडवतो आहेस ?

**विठू**—बाईसाहेब तुम्हींच नाहीं का मघाशीं लक्ष्मी शोधायला सांगितली ? ( लक्ष न देतां ) आं, हाय, हाय ही बघा सांपडली ( एक केरसुणी हुडकून काढून दाखवितो. )

**रमा**—गाढव आहेस झालं. शुद्ध सांबापुढचा आहेस तूं. तुला मी " लक्ष्मी " बघ म्हटलं होतं केरसुणी का वेड्या ?

**विठू**—लक्ष्मी.........लक्ष्मी वहिनी व्हय. आमच्यांत हिला लक्ष्मी म्हनत्यात. म्हणून मी हीच समजलों. ती लक्ष्मी कशापायीं इथं येईल ? हें का स्वयपाक घर, का कोठी, का गाईचा गोठा ! इथं ती येईल तरी कशापायीं !

**रमा**—इथं ? इथं आहेत ना नवरोबा तिचे ! त्याच्याशीं गुलगुल बोला-यला यायची. मला चांगला भास झाला, दोन माणसं बोलता आहेतसा. पण म्हटलं, मला जिना चढायला वेळ लागेल ! म्हणून तुला पाठवलं, वाटलं की तूं हें गपचिप करशील ? पण तूं कसला......गाढव !

**विठू**—नाय हो बाईसाब, मी तुमच्या सांगिवानी अगदीं गपचिप "लक्ष्मी" शोधली, पन समदा समजुतीचा घोंटाळा. तुम्ही ती सांगितली नी मी ही समजलों.

**रमा**—कायरे बाप्या ! खरं सांग इथं दुसरं कोण बोलत होतं ?

**बापु**—कुणी नाहीं बुवा ! मी आपला अभ्यास करतो आहे कीं.

**रमा**—छे, मला चांगली दोन माणसं बोलल्यासारखीं वाटलीं.

**विठू**—बाईसाब असं तर लयी येळा बापूराव करत्याती. दोन, दोनच काय ! पन तीन तीम माणसांचा आवाज काढून बोलत्याती. योंकदां तर त्यांनीं मला चार माणसांचे चार परकारचे आवाज काढून नाटकाची 'नक्कल' करूनशान दाखवली. लयी लयी हुशार आहेत ते. आवंदा फडसात बी० होतील नी वकीलसाब बनतील.

**रमा**—गप बस रे मेल्या किती वटवट करशील ! अशा गप्पांनीं मी मूळ गोष्ट विसरेन असं का तुला वाटतंय !

**विठू**—( स्वगत ) तुम्ही इकत्या भोळया, असं कोन म्हणेल ?

**रमा**—हां बापू बोल, बोल बरं, दुसरं कोण होतं ते ! त्या कवटाळ-णीच्या नादीं लागून, खोटं बोलायला शिकूं नकोस अं. ती महापाजी घराण्यांतली मुलगी आहे, मला जर हें आधीं ठाऊक असतं, तर मी हें लग्न कध्धीं कध्धीं केलं नसतं. पण आतां संभाळ रे बाबा, तुझ्या भल्याकरितां सांगतें आहे, माझं काय ! पण आपलं वाटतं कीं, तुझी विद्या एकदां पुरती व्हावी, अन् तूं चांगला मोठा थोरला अंमलदार व्हावास. अस्सं माझ्या वेड्या मनाला वाटतं. हं सांग बरं मग, कोण बोलत होतं तें !

**बापू**—आई, खरोखरच कोणी नव्हतं, मी किनयी क्लासाचे धडे वाचीत होतों, त्यांत प्रोफेसर मला प्रश्न विचारताहेत, व मी उत्तर देतों आहें, असं वाचित होतों, त्यामुळं तुला तसा भास झाला.

**रमा**—हें खरं ना ! खरं ना पण हें ! मला नाहीं ना फसवीत तूं ?

**विठू**—खरं तर ! आक्शी खरं. तुम्हास्नी बापूरावांनीं कधीं फसवलं हाय !

[ पडद्यांत बाळी ओरडते.........आई, आई, आई ऽ ऽ ग. ]

**रमा**—कोण, बाळी का ! [ इतक्यांत नाना बाळीचे दोन्ही हात धरून तिला ओढीत आणितो. ]

**बाळी**—आई, बघ ग, मी नको म्हणत असतांना, मला या नानानं ओढून आणलंन; आतां मी तुला चांगला चोर पकडून देणार होतें. मघा दादाशीं वहिनीच बोलत उभी होती ग. तुझा आवाज ऐकून ती मागल्या माडींत पळाली. ती मागल्या जिन्यानं जाईल, म्हणून मी तिथंच मागल्या जिन्यांत बसल्यें होतें, तर या नानटल्यानं मला धरून आणलीन. सोड माझे हात, आतां ती खालीं पळाली देखील असेल.

**रमा**—कायरे नाना एवढा मोठा झालास, तरी तुझी अजून खोडकरपणाची संवय जात नाहीं ! आतां ती मोठी झाली.

**नाना**—मावशी, तिला आनंदाची बातमी सांगायला मी आणली नको तर राहिल. बस जा जिन्यांत. मी आपला जातों कसा ! बापू, चल येत असलास तर, नव्या निघालेल्या श्रद्धानंद हॉटेलांत आपण आइसक्रीम घेऊं.

**रमा**—वा मोठाच शाहाणा आहेस, हॉटेलांत जायचे ढंग शिकला आहेस वाटतं. अन् आतां बापूला शिकवणार ! बापू नाहीं यायचा हो. बाप्या आणि हॉटेलात ! पाय मोडीन हो त्याचा मी !

**बापू**—अग आई आधी त्याची बातमी ऐकायची आहेना !

**रमा**—हो, हो. खरंच कीं, कसलीरे बातमी ?

**नाना**—बाळीच्या नवऱ्याची.

**रमा**—अरे सांग तरी, सांग, सांग, कुंठ जमलं का !

**बाळी**—कायरे नाना, माझं सामान नाहीं आणलंस ते ?

**नाना**—तुझा, माझा काय संबंध ? मी कशाला सामान आणू ?

**बाळी**—असं रे काय करतोस ?

**रमा**—अरे सांगना काय झालं तें ? सांगशील की नाहीं ?

**नाना**—थांबा, थांबा, मी आधीं हॉटेलांतून चहा घेऊन येतों ! कारण माझी झाली आहे चहाची वेळ !

**बापू**—अग आई, त्याला चहा हवा आहे.

**रमा**—अरे विठू, तोंड बघत काय उभा राहिलास ? लक्ष्मीला सांग चहा करायला.

**नर्मदा**—( प्रवेश करून ) मामी चहाची वेळ झाली, चहा करूं ना ?

**रमा**—कां, तूं का आलीस ? ती कुठं गेली ? तिला आळशीला तेवढंही काम होईनाका ?

[ विठू लक्ष्मीला बोलावून घेऊन येतो. ]

**रमा**—काय सुनबाई, आतांशीं चहा सुद्धां वन्सवर पडलाय वाटतं ! चोरून मारून गप्पा मारण्याखालीं, चहा करायला फुरसत होत नसेल ! कांहीं म्हण नाना, पण या कार्टीपुढं अगदीं शर्थ झाली बाई, अगदीं भंडावून सोडलं आहे मला तिनं ! आतां आजचंच पहाना ? ही माहेरी जायची, म्हणून हें धड लुगडं नी दोन जिन्नस दिले घालायला ! तर आपलं चटदिशीं चहा केला, सर्वांना दिला, गेलं आपलं माहेरीं ! तें कांहीं नाहीं, सांगितलान् आपला तिला करायला !

**नमू**—मामी त्यांनीं नाहीं सांगितला हो ! त्यांचा जरा पाय दुखत होता, जिनें चढतां येणार नाहींत, म्हणून मीच विचारायला आलें हो !

**विठू**—वहिनी, पायावर भार देऊनच उभं रहावं. वाकडं उभं राहून एकदां भरावलं किनयी म्हणजे लई दुखतो.

**लक्ष्मी**—मला चहा करायचा सांगायलाच, बोलावलं होतं ना ? मग आणते, कीं करून !

**रमा**—( तोंड वेडावून ) आणते कीं करून. साळसूदच जशी कांहीं अगदीं.

**बाबासाहेब**—( प्रवेश करून ) हें काय हें ! हा रोजचे रोज कसल फार्स आहे नाना ?

**रमा**—फार्स कसला डोस्क्याचा. या, या आपल्या शहाण्या सुनबाई ! नाना आला, आपली पण सर्वांची चहाची वेळ झाली, चहा करायचा हें नको का सुचायला ?

**नमू**—मामी चहा झालेलाच आहे ! वर आणायचा का ? एवढच फक्त मी विचारायला आलें होतें !

**बाबासाहेब**—वा: छान......लक्ष्मी, तूं अजून माहेरीं का नाहीं गेलीस ? खुद्द दादासाहेबांनीं मला सकाळपासून तुला पाठवायला सांगितलें होतं नी मी तें कबूल ही केलं होतं.

**रमा**—हं, जाग जा दोघी जणी, चहा घेऊन या. विठ्या तोंड काय पहातोस ? कांहीं बसायला आण !

[ चहाचीं दोन तबकं घेऊन, नमू आणि लक्ष्मी येतात. ]

[ तबकं मध्यें ठेवतात, रमाकाकू सर्वांना देतात. दोन पेले उरतात, त्यांतला एक नमूपुढें ठेवून दुसऱ्यांतला नानाच्या पेल्यांत ओतते. ]

**रमा**—नाना, तुला अधिक चहा हवाना ! घे.

**बाबासाहेब**—पण सूनबाईचा कुठे आहे ? तिला द्या कीं, ती चहा पिऊन आधीं चालायला लागूं दे.

**रमा**—आणखी नाहीं का उरला ? बरं नसला तर नसला, आतां माहेरींच जायची आहे.

**नमू**—आणखी नाहीं शिल्लक. पण ह्याच आम्हीं दोघी मिळून घेतों.

**बाबासाहेब**—छे, छे, तसं नकोच. नमे, ये इथं बैस पाहूं. हं बैस, बस. माझ्या बरोबर चहा घे बघूं ! नाना करा सुरवात. (सगळे चहा घेतात.)

**बाबासाहेब**—लक्ष्मी, हा माझा पेला तुला घे, हं चल आटप, पी. विठू, अरे विठू ! विठू ( प्रवेश करतो. ) अरे, टांगा करून, सुनबाईंना माहेरीं पोचवून ये, हं, जा बाळ लवकर हं. कायरे नाना आतांचा चहा कांहीं मोठासा चांगला झाला नव्हता नाहीं ? हं जा बाळ, बाळूताई, सुंदरसा दोन पेले चहा करून आण बरं ! ( बाळूताई, तोंड वाकडं करीत पाय आपटीत जाते, लक्ष्मी नमू, विठू, जातात, जातांना चहाचीं भांडीं उचलून नेतात. )

**रमा**—नाना, बघतो आहेसना हे सगळे चाळे ! यांना काय वाटतं. कीं मला हें समजत नाहीं म्हणून ? यांच्या अशा वागण्यानं, घरांत माझा बोज राहील का ? यांनीं म्हणे कबूल केलं होतं व्याह्यांना ? हे कबूल करणार कोण हो ! बायांच्या व्यवहारांत पुरुषांना काय कळतं यं ! आतांच पाहिलस ना ?

आपला चहा, तिला दिला. आतां ही माहेरी जायची मुलगी. तिथं गेल्यावर आई चहा दिल्याशिवाय राहील का तिला !

**बाबासाहेब**—अहो, हें पहा, मुलांच्या देखत म्हणून, तुम्हांला म्हणायचं नाहीं पण तुम्हीं अकारण त्या मुलीचा द्वेष करता; तुमचं उदाहरण पाहून बाळी देखील तशीच वागते. पण परिणामीं हें जड जाईल बरं ! मी बजावून ठेवतों.

**रमा**—हो, हो, पुरे, पुरे बजावणं. मला हें सारं समजतयं. पण केवळ या बाळीच्या लग्नासाठीं म्हणून थांबलें आहे. ( नानाकडे बघून ) पण त्या स्थळाचं काय सांगत होतास ?

[ पडद्यांत—नाना, नाना, झाला, खालीं या. ]

**बाबासाहेब**—चला, बुवा, तुझ्या बहिणीनं चहा केला आहे, तो आणखी वर आणायला सांगायला नको, आपणच खालीं जाऊन पिऊं

**नाना**—बरं, चला तर मावशी, चला, खालीं चहा पितांनाच सारं कांहीं सांगतों.

---

# अंक १ ला.

---

## प्रवेश दुसरा

[ नमू हातांत पाण्याची घागर घेऊन येते ]

**—पद—**

[ चाल--पिया सोने हा नये तुम् ]

**। वेगें वेलिया उसळतां । सहजिं सुमन हांसे ॥**
**। अभिनव रेणु पवनिं मिसळतां । सज्जन मानस हर्षित होतां ।**
**। हरि-लीला ठसवित नित हा।भवभय हरि त्राता । सुखविता॥१॥**

**नमू**—संध्याकाळची वेळ झाली, जरा मागील दारचीं झाडं शिंपू या. खरोखर या झाडांची स्वत: सेवा मशागत करण्यांत किती मौज वाटते !

आपल्या हातानं झाडें लावावी, पाणी घालावं, निगा राखावी, नी मग तीं फुलं नी तुळशी देवाला वहाण्यांत किती धन्य, धन्य वाटतं. माझ्या गुलाबावर फुललेलं पहिलं फूल मी किती भक्तिनं रामप्रभूला घातलं, गेल्या एकादशीला तुळशी मंजिऱ्यांची माळ गोपालकृष्णाला घालण्यांत, मला किती मजा वाटली, खरोखर सेवेंतच आनंद आहे. परमात्म्यानं मनुष्यजन्म सेवा करण्याकरितांच दिला आहे, असं मला वाटतं. कांहीं माणसांना सेवा घेण्यांत आनंद वाटतो खरा, पण दुसऱ्याची सेवा केल्यानं आपल्याला किती समाधान होतं, याचा अनुभव मला वाटतं त्यांनीं घेतलेलाच नसतो. आपले पाय दुखावे, आणि मग दुसऱ्यांनीं चेपावे, यांत पदरीं चेपायला माणसं आहेत, हा खरा आनंद नाहीं. कारण दुसऱ्याचीं दुःखें आपल्यालाच सोसावीं लागतात, त्यापेक्षां न दुखण्यांतच मजा. आतांचंच पहाना ! मला देवाची नी मामाची सेवा करण्यांत किती समाधान वाटतं ! पण आमच्या समाजांतील समाजकीटकांना आमचं तेंहीं सुख पाहवत नाहीं. कारण आमचा कैवार घेणारे सगळे पुरुष आपल्या मनावरून, आमच्या मनाची परीक्षा करून उठल्यासुटल्या आमच्या उद्धाराचा विचार करीत असतात. त्यामुळें कोठें बाहेर पडायची सुद्धां चोरी ! ‘ पोट दुखुं लागलं कीं, ओवा मागेल’ ही म्हण बाजूला पडून, ओंवा आहे अजून पोट नाहीं का दुखत ? असं म्हणायची वेळ आली आहे, माझ्या सारखी दुःखी दिसली कीं पुनर्विवाह कां करीत नाहीं ? आश्रमांत कां पाठवीत नाहीं ? या प्रश्नाला सुरवात ! कारण पुरुषाला जसं बारावं संपलं कीं, बहुल्यावर उभं राह्यची घाई असते, त्याच मनोरचनेनं ते आमच्याकडे पहातात. पण आम्हां स्त्रियांची खरी मनोरचना त्यांना समजतच नाहीं. पण जाऊं देतं, आतां हे विचार कशाला ! चटदिशी झाडांना पाणी घालून घरांत जावें झालं ! (जाते)

---

# अंक १ ला



## प्रवेश तिसरा

( स्थळ—बाबा साहेबांच्या घराचा पुढचा भाग. )

**नाना**—कायरे विठू कुठं गेला होतास ?

**विठू**—वहिनींना आणायाला.

**नाना**—इतक्यांतच आणलीस ?

**विठू**—आपून काय हुकमाचे चाकूर ?

**नाना**—तेंही खरंच. बाकी दोन दिवस रहाती तेवढाच विसावा ! गरीब फार गरीब, अश्राप मुलगी, मावशी फार छळतात नाहीं का ?

**विठू**—उं, त्यांत काय हाय, आमच्यांत तर मारत्याती. सासू मारते सासरा मारतो, ननंद गालगुच्चे घेते, पन इतक्यावरही भागत नाहीं.........

**नाना**—अरेरे, शी, शी, मग...........

**विठू**—सासू तिच्या नवऱ्याकडून मारवती. तो वखताला, नाई म्हनाला तर अशा ओंगाळ शिव्या देती कीं, तो उठतोच मारायला, नी असे सपासप लगावतोया कीं, यंवरे यंव ! आमच्या बाईसाब कधीं असं वंगाळ करत्यात का ? बोला ? त्यांनीं कधीं तरी हात का पाय लावला सुनेला ? खरंका नाय ? आमच्या वकताला, भाकर नाय मिळायची पोरीला ! पन नवऱ्याचा दुधाचा रतीब नी बायकोचा माराचा रतीब चुकत नाय.

**नाना**—वा वा, जें ऐकावं, तें नवलच ? छे, छे यांत सुधारणा करणारी एकादी संस्था काढली पाहिजे.

**विठू**—कुठली संवस्था नी कसली सभा करत्यात, सभेनी काय होतं. कुणब्यावाणी बामनानी "पाट लावावे" हेच कीं नाय ? मार बंद करण्याची सभा होती कुठं ?

**नाना**—अरे बाबा ज्या जातींत जें चांगलं सांपडेल, तें घ्यावं. तुमची पुनर्विवाहाची चाल, पंच नेमायची चाल, ह्या चांगल्या, त्या घ्याव्यात.

**विठू**—होय, होय तुम्हीं घ्या की, त्या म्हणजे मग पंचायतीला, लालपानी लागतं तें बी चाईचं नाहीं ; हुं.

**नाना**—छे, बाबा, विठू तुं तर ............

**विठू**—मी, मी काय केलें, खरं बोललों ! अन् खरं बोलायला कुनाच्या बाची भीती ! तुम्ही सभा करून बायांचा पाट लावायच ठरवता, पन सभेंत दारूपानी करता नाहीं. आमच्यातली ही चांगली चाल तुमच्यांत नको या या !

**बापू**— ( प्रवेश करून ) अरे नाना तुला बोलायला कोण ? विठू का भेटला. भले शाबास ! घरांत सगळीं तुझी वाट पहाताहेत, नीं तूं आहेस इथं ओट्यावर गप्पा छाटतो आहेस ! चल, चल.

**नाना**— अरे पण हो, हो अजून तो नवरदेव यायला अवकाश आहे ?

**बापू**—अरे, इतक्यांतच नवरदेव म्हणूं नकोस.

**नाना**—कां ? नाहीं कां ? होयच म्हण कीं, त्याला असा बनवून ठेवला आहे कीं, यंवेर यंव. नुसता पहाण्याचा फार्स करून होय म्हणायचं झालं ?

**बापू**—चल, चल तर आंत. विठू, तूं पानसुपारीचं बघ.

[ जातात. ]

---

# अंक १ ला

---

## प्रवेश ४ था

[ स्थळ-दिवाणखाना-आरशापुढं उभी राहून बाळूताई, निरनिराळ्या प्रकारानं आपला पोषाख सावरते आहे, अर्धवट ओंचे, मोकळे केस, पदराला पीन, केसांत पिन अडकविलेली असा तिचा पोषाक आहे. ]

[ नाना आणि बापू येतात. ]

**नाना**—काय बाळुताई ! जमला का पोषाख अपटुडेट; पण तसंच झोकांत, इंग्रजी बोलतां आलं पाहिजे.

**बापू**—हां तेवढा उजेड ! नुसतं मराठी न का धड येईना, हजारदां सांगितलं असेल, जरा वाचीत जा म्हणून !

**बाळी**—आम्हांला नको यायला, आपल्या राणीसरकारला काय तें शिकवा.

**नाना**—बरं, पण आधीं वहिनींना चहा आणायला सांग जा.

**बाळी**—माझं अडलं आहे खेटर! हवा तर तो सांगेल त्याच्या बायकोला.

**रमा**—( प्रवेशून ) कोण ? नाना! केव्हां आलास! अरे, तसाच आंत येऊं नयेस का? चहाच चालला होता! सूनबाई बोलली नाहीं, नुसती दारांत उभी राहून काय करीत होती ती ? ती की नाहीं नुसतं मनुष्य आहे! बरं नवऱ्याला तरी चहा विचारायचा. कांहीं आहे का! आज मी आहे! पण मग पुढं बापू तुझं कसं होणार ? विठू, अरे विठूं, विठ्या! ऽऽ.

**विठू**—जी, काय हव ?

**रमा**—अरे नाना, बापूना चहा हवा ना, सांग तुझ्या वहिनीला.

**विठू**—शंभर वर्सं आयुख माझ्या वहिनीला! अहो लाजतां का? बिगि बिगि या कीं, हा पहा चहा. चहा म्हटला कीं, चहा तयार!

[ लक्ष्मी चहा आणते. ]

**रमा**—नाना पाहिलंसना! आतां चहा संपलेला होता, पण करूं का म्हणून मला विचारलं सुद्धां नाहीं ? काय ग एं, तुला, थोडी तरी भीती? मला विचारावंस कीं, नाहीं. चहा करूं का म्हणून ? बाकी खरं म्हणजे, मी कर म्हटल्याशिवाय करायचाच नाहीं. माझ्याघरांत अशी उधळपट्टी करायला तुला कुणी सांगितलं ?

**बाळी**—अग आई, ती माझ्यासारखी अडाणी नाहीं, शिकलेली आहे, तिला नवऱ्याची काळजी वाटली.

**रमा**—बाळे, तूं नको आहेस मला शिकवायला ? समजलं. नवऱ्याची काळजी वाटते! काल लग्न करून नाहीं आली तर आज तिला नवऱ्याची काळजी वाटते. बोचक सटवीच. विठू, विठू आतांच्या आतां हिला माहेरीं पोंचवरे. नकोच माझ्या घरांत कटकट.

**विठू**—जी, बरं हाय, हं वहिनी चला, लवकर चला.

( ती दारापर्यंत जाते, विठू पाठमोरा होतो; बाबासाहेब येतात. )

**बाबा साहेब**—विठू.

**विठू**—( परत फिरून ) जी.

**बाबा साहेब**—काय करतोस ?

**विठू**—वहिनी संग जातो. त्यांच्या बाच्या घरीं पोंचवायला ! पण बाईसाहेब, तुम्हाला एक याद करूं का ?

**बाबा साहेब**—काय भानगड आहे रे ?

**रमा**—जरा, जरा गप बसलं तर, मला बोलूं द्या. कसली रे कटकट आहे तुझी !

**विठू**—तसं कांहीं नाहीं, पन वहिनी गेल्यानी तीं माणसं आलीं, तरा चाई-बाई करायला कोण ? म्हून पुसतो ?

**बाबा**—लक्ष्मी, कोण तूं का उभी ? जा, जा घरांत. विठू तूं खाली बस जा. आणि माणसं आलीं कीं, सांगायला ये. जा. नाना, काय भानगड आहे ही ? लक्ष्मीला कुठं पोंचवावयाची होती ? आणि बाळे, हें काय ? काय तुझा पोषाख ! आतां नाटकांत नटींच का काम करणार आहेस तूं ?

**रमा**—हूं आतां दृष्टी पोरीवर गेली वाटतं ! तिनं काय केलं, हल्लीं सगळीं कडेच हे चाळे निघाले आहेत.ते आपल्याला न आवडून कसें चालेल ? पाहयला येणाऱ्यांना आवडतनां ?

**बाबा**—त्यांना काय आवडतं, तें आज नाहीं विचारलं ! आज आपल्या घराण्याचा प्रश्न आहे.

**विठू**—पाहुणे आल्याती.

**बाबा**—(पुढें होऊन) या, इकडे या असे, ( रमा आंत उभी राहते. )

**नाना**—यावं, यावं, प्रभाकरपंत, या मधुकरराव. हे बाबासाहेब, हे त्यांचे चिरंजीव बापूराव. ती आमची बाळूताई. ये, ये बाळूताई, खुर्चीवर बस.

**बाबा**—आपली माहिती मला नानानं दिली आहे, आतां एल् एल्. बी.च होणार ना!

**प्रभाकर**—हो, असा विचार आहे बरा.

**बाबा**—कांही विचारा, विचारायचं असलं तर ?

**मधु**—काय ! प्रभाकरपंत ?

**प्रभाकर**—छे, नको, जाऊं दे.

**मधु**--आम्हाला सारी माहिती नानासाहेबांनीं दिली आहे, उगीच आपली विचारयाची कवाईत कशाला ?

**नाना**—हं, बाळूताई जा. बाबासाहेब, म्हटलं नव्हतं कीं प्रभाकरपंत कीं प्रभाकरपंत.

**मधुकर**—हां, हां खाऊचा पुडा घेऊन जाऊं देत.

**नाना**—हां, बाळू ताई, घे, घे मला खायला मिळेल.

[ बाळू ताई पुडा घेऊन जाते. ]

**बाबा**—आंत चला, जरा खाखर पाणी ( बाबासाहेबा खेरीज सगळे जातात. ) या पोरीच्या लग्नानं मी अगदीं जिकिरीला आलों. वळण नाहीं, रूप नाहीं, विद्या नाहीं ! तेव्हां अशा मुलीला, धनवान्, रूपवान्, गुणवान् असा कोण पतकरणार ? तेव्हां अर्थात् होतकरू पण दरिद्री मुलगा गांठल्याशिवाय सद्गत नाहीं. त्या दृष्टीनं हा मुलगा जर होय म्हणेल, तर बरा आहे.

[ सगळीं परत येतात. ] [ प्रभाकर मधू नमस्कार करून जातात. ]

**नाना**—काय ! मावशी स्थळ पसंत आहेना ? आजपासून दोनवर्षांनीं बाळी मुनसबीण होणार ! मग काय, ओळखाल का बाळूताई

**बापू**—अरे, पण आधीं पसंतीचं ठरलं का ?

**रमा**—माझ्या बाईला, कोण नाहीं पसंत करणार ?

**बाबा**—वा, वा तें काय विचारावं ! अप्सराच कीं नाहीं ती। !

**रमा**—हें काय ? काय हें ? आपल्या लेंकराला आपणच का असं म्हणायचं ! ती वाईट का आहे ? एक जरा कातडी उजळ नाहीं, एवढंच.

**नाना**—हें पहा, बाबा साहेब, आपल्या वहिनींच्या सारखी पांचशेंत नाहीं, पण दहाजणी सारखी आहे.

**बापू**—खरं बोलायचं म्हणजे बाळूताई कांहीं टाकाऊ नाहीं, पण ती हे जे वेडे विद्रे पोषाख करते, त्यामुळें जास्तच बावळट दिसते.

**बाबा**—अरे ती अधुनिक सुधारणा आहे सुधारणा !

**बापू**—पण सर्वांनाच नाहीं ती शोभत ?

**रमा**—बाप्या, नानानं तुझ्या बायकोला जरा सुरेख म्हटली, म्हणून चढून जाऊं नकोस आं ?

**बाबा**—अरे, तुम्ही तर लहान मुलांसारखे भांडायला लागलांत. चल रे नाना आपण इथन जाऊंच कसे ! ( बाबा साहेब व नाना आतात. )

**रमा**—बाळे, चल बाई, आपण ही जाऊं, रोज रोज मेली ही कट कट नको, बापू तांगा आणीव रे, आम्हीं जरा हिंडून येतो. चल बाळे मला लुगडं बदलूं दे.

[ लक्ष्मी प्रवेश करते, बाकी सर्व जातात. ]

**लक्ष्मी**—हें काय ! इथंतर कुणीच नाहीं ? कांहीं तरी खटका उडालेला दिसतो. काय असेल तें असो बाई ! आमच्या या घरांत सदा खटक्याशीं गांठ ! सासूबाई नी वन्सं यांच्या विरुद्ध ओंठ देखील हलतां कामा नये. परमेश्वरा ! अशा या संसार सुखांतून यशस्वी रीतीनं पार पडण्याचं तूं मला सामर्थ्य दे.

### पद

[ चाल--यशा देई दीना-नाथा ]

। हरी दावि दावि आतां । तूंचि सौख्य-दाता ।
। जीव त्रस्त झाला झाला । व्यसनिं या निमाला ।
। सुखाचा दीप मावळतां।उदय दुःखाचा ।
। व्यापिली सुधाव्यसनें । वीट जीवनाचा ।
। मार्ग-दावि सदया आतां । तूंचि सौख्य दाता ॥

**नर्मदा**—( प्रवेश करून ) का वहिनीबाई देवाला फारसं आळवणं चाललं आहे ? या निमित्तानं का होईना, पण तुला देवाची आठवण होते ना ? ती अशीच सतत होत राहूं दे, म्हणजे तो करुणाघन प्रभु तुझी संकटं दूर करील.

**लक्ष्मी**—वन्सं, असल्या या बिकट परिस्थितींत, आणि कशानेंही खूष न होणाऱ्या माणसांत, माझा निभाव लागेल का ?

**नमू**—अग वेडे, खूष होणाऱ्या माणसांना, खूष ठेवण्यांत आपली करामत कसली ! परमेश्वर तरी कसोटी शिवाय पावतो का ? त्याला प्रसन्न करायला खडतर तपश्चर्याच करावी लागते. फक्त मागल्या जन्मींच्या पाप-पुण्या प्रमाणें कमी-अधिक एवढंच ! पण तपश्चर्या ही पाहिजेच !

**लक्ष्मी**—वन्सं, तुमचं म्हणणं कबूल, पण मी आपल्याकडनं, सासूबाई नी वन्स यांची तब्यत खूष ठेवण्याकरितां किती प्रयत्न करते, पाहातानां !

**नमू**—अग हो, अशा कुठं २ अडीचं वर्षांच्या तपानं का कुठं, फळ मिळतं ! दगडाला देवपदाला पोंचायला किती तरी टाकीचे घाव सोसावे लागतात. बायकांना सुखाचा संसार साधायला, अनेक संकटांना तोंड द्यावं लागतं. वहिनी, गृहणी, देवता, पतिव्रता या पदव्या कांहीं सोप्या नाहींत, सीता, सावित्री, द्रौपदी यांनीं कित्येक वर्षे नी कशा बर खडतर तपश्चर्या केल्या त्या वाचा नी मनन करा.

**लक्ष्मी**—वन्स, पण मनाला कसलं तरी सुख नको का ? त्या पतिव्रतांना संकट सोसायला पतींच सहकार्य होतं.

**नमू**—अग सूख म्हणजे काय ? ते मानण्यावर अवलंबून असतं. सुखाला आपण आपल्या अंकित ठेवावं लागतं. सुखाचा खरा शोध लागायला परमेश्वरालाच शरण जावं लागतं. म्हणजे क्षणिक हलक्याशा वाटणाऱ्या सुखाचा ठेवा तर तो देतोच, पण शाश्वत सुखाचा मार्गहि दाखवितो. वहिनी एकदां त्या रामप्रभूला आपला म्हणून, त्याची भक्ती करून पहा, म्हणजे फळाच्या आशे-शिवाय कर्तव्याला मन कसं तयार होतं तें कळेल.

## पद

[ चाल--विधिघटणा प्रलोभना ]

**। विधि घटना । सुटे कुणा ? । घडवि सकला कृतिस जगीं या ।**
**। मनुज भ्रमोनि उलट जाणा । विधी घटना ॥ १ ॥**
**। जगतिं भरुनि उरला । जनिवनिं स्थिरचर, सारें व्योमहि भरला ।**
**। सकल सुखा-सुख जाणा ॥ २ ॥**

**लक्ष्मी**—खरंच वन्सं, इतक्या लहान वयांतलं तुमचं हें शहाणपण पाहलं, नी तुमच्या दुःखाशीं माझ्या दुःखांची तुलना केली, म्हणजे मी तुमच्याशीं काय बोललें, असंच मला वाटायला लागतं. मी भावनेच्या भरांत तुमच्या परिस्थितीचा विचारच केला नाहीं.

**नमू**—माझी कसली परिस्थिती ! त्या श्रीरामाच्या कृपेनें माझ्या मनाला शांती आहे. तूं...मामा...अशा प्रेमळ माणसांचा मला सहवास आहे.

**लक्ष्मी**—छे, आम्हीं कसले प्रेमळ ! प्रेमळ तुमचे

### पद

[ चाल–गझल ]

**। सुंदराची सुंदराशा । सुंदरानें कां करावी ? ।**
**। वैभवाची वैभवाशा । वैभवानें कां धरावी ? ।**
**। मोह इकडे मोह तिकडे । मोह जाळें पसरलें हें! ।**
**। जीव बहके, होय बेभान् । वीष भिनले दीन बा हें !॥ २ ॥**

**नमू**—चला वहिनी, कितो वेळ आपण इथं उभं राहिलों ? दिवे लावणेची वेळ देखील झाली. ( जातात. )



# हीच मुलीची-आई

## अंक दुसरा

### प्रवेश १ ला

[ उपवनाच्या मार्गावर प्रभाकरपंत उभे आहेत. ]

**प्रभा**–कोणी कांहीं म्हणो, पण आपलें तर ठरलें आहे कीं, जगांत एक. येन केन प्रकारेण पैसा, पैसानीं पैसा. पैसेवान नेहमीं सर्वगुणसंपन्न असतो. गरीब, दुबळा नादान परमार्थ साधायला देखील पैसाच लागतो, परोपकार करायलाही पण पैसाच लागतो, सुखासमाधानानं पोट भरायलाही पण पैसाच उपयोगी पडतो. तेव्हां असा जो पैसा तो कसा मिळेल, हें पाहिलंच पाहिजे. आणि म्हणूनच मीं रावसाहेबांची काळी मुलगी पसंत केली. लोक हंसतील. हसोत बापडी ! द्रव्याच्या लोभानं, हुंड्याच्या आशेनं, काळी मुलगी पत्करली म्हणतील, म्हणोत बिचारे ! आपण तर आपले, स्वहिताचा धंदा कोणी निंदा अथवा वंदा या मार्गाचे. कारण या हसणाऱ्यांना असं कळत नाहीं, शिकले सवरलेली गोरी गोमटी श्रीमंतांची मुलगी मला गरिबाला कोण कशाला देईल ? तिच्यासाठीं श्रीमंतांचे गुलहौशी तरूण का थोडे आहेत ? अन् तशांत दिली एखाद्यानें, तरी मी घेऊन करूं काय ? माझंच पोट भरायची पंचाईत ! तिथं तिच्या हौशी कशा भागवूं ! चालू काळांत, अठरा धंदे करा, म्हणून लोक उपदेश करतात, पण आज कितीएक पिढ्या आमच्यावर जे संस्कार केले गेले आहेत, त्यामुळें आमच्या हातून कांहीं सुद्धां होणं नाहीं. जो उठतो तो, परीक्षेच्या कोर्सांत अर्थ नाहीं म्हणतो. कबूल, दहा वेळ कबूल, पण पुढें काय ? एक येऊन जाऊन खादी विकावी, अथवा इरकली लुगडीं, खण घेऊन दारोदार हिंडावं. गल्लोगल्ली डॉक्टर, वकिलांच्या पाट्या लागल्या आहेत, हें आम्हांला सुद्धां दिसतं ! पण करणार काय ? नुसत्या बी. ए. ला काय किंमत आहे. येऊन जाऊन शाळा खातं. पण मला तर तें मेंढरें वळायचं काम मुळींच

आवडत नाहीं, अर्थात एल् एल्. बी. परीक्षा देण्याच्या राजमार्गाखेरीज मार्ग नाहीं. ती देऊन नशिबाचे फासे कसे पडतात, तें बघायचें. पण शिकायचें कसें? आमच्या बाबांचा स्वभाव आणि उत्पन्न पहातां, झालें हेंच शिक्षण जास्त झालं. आमच्या आईच्या बाणेदार स्वभावामुळं, आम्हाला येथपर्यंत मजल गाठतां आली. आतां, यापुढं त्या माऊलीचं सत्व घेण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. तेव्हां एकाद्या, श्रीमंताची अव्यंग अशी मुलगी करून आणून हुंडा घेऊन, आपला पुढील शिक्षणक्रम संपविणें मला प्राप्त आहे. याहष्टीनें पहातां रावसाहेबांची मुलगी मी पसंत करण्यांत चूक केलीशी वाटत नाहीं. मुलगी अशिक्षित आणि काळी आहे, एवढेंच, पण आईची लाडकी आहे, व बापाची एकच आहे. अर्थात अस्मादिकांचें नेहेमीं जयजयकारच होणार; चला बुवा आतां आपणाला सासुरवाडीलाच जायचं आहे.

---

# अंक दुसरा

## प्रवेश २ रा

[ बाबासाहेबांचें माजघर, रमाकाकू, बापू बसलीं आहेत ]

**बापू**—आई आज तुला बरं आहे नाहीं? पण इतक्यांत अगदीं येथें येऊन कां बसलीस?

**रमा**—अरे आम्ही कष्ट केलेलीं माणसें आम्हाला का बसवतें, अगदीं नाईलाज झाला म्हणजे बसायच. पण तूं आज लवकर कसा?

**बापू**—काम ही आटपलं होतं आणि तुला बरं नाहीं म्हणून आलों झालं.

[ लक्ष्मी दोन पेले चहा आणून ठेवते ]

**रमा**—छे छे. अगदीं मेल्यानीं लाजा सोडल्यात, जसे कांहीं ह्यांनाच नवेर, त्याच काळजीच्या, आजपर्यंत ह्यांच्या काळजी शिवायच वाढले! अग पण नवऱ्याचा कंठ कां सुकला होता? जरा मी चहा आण म्हणायची तर वाट पहायची होतीस; शर्थ झाली पण. उचल माझ्या पुढचा चहा. मला नको तो, तो घेईल हवा तर, मी कांहीं अशा अपमानानें चहा पिणार नाहीं.

**बापू**—आई ! तूं जरा आजारी नाहींस का ? मग तुला सांगायचे श्रम न पडतां चहा आला तर बिघडलं कुठें ?

**रमा**—( वेडावून ) बिघडलं कुठें ? लाज नाहीं वाटत तुला असं विचारायला ? कोणाला चहा करायचा कोणाला नाहीं हें ठरविणारी मालकीण ही कोण ?

**बापू—बरं** आतां पी, पुन्हां आईच्या परवानगीशिवाय करीत जाउ नका हां ?

**रमा**—बाप्या, अरे बाप्या तूं माझ्या देखत मोठं गौरवून अह्रो जाह्रो म्हणून बोलतो आहेस.इतकीं वर्षं चुलींत गेली ? माझा अपमान,माझा अपमान माझ्या देखत ! अरे, आह्मी दोन मुलं होईपावेतों सासूबाईंच्या देखत बोललों नाहीं.

**बापू**—बरं आई आधीं चहा घे निवेल आणि बोलून तुला त्रास होईल.

**बाळूताई**—आई आज दिवसा नाटक आहे मी जाऊ काग ?

**रमा**—पण नेणार कोण ?

**बापू**—आणि आज तुला संध्याकाळीं घरीं पोचवायचें कबूल केलें आहे.

**बाळूताई**—म्हणजे ग काय ?

**बापू**—म्हणजे सासरीं जायच.

**बाळूताई**—मी नाहीं जा. आई जा म्हणना, नाहीं तर मी तुझ्याशीं बोलायची नाहीं हां. मी जाणार. नवा खेळ आहे. तूं कळव सासूबाईंना त्यांत काय मोठं ! येऊन जाऊन संध्याकाळचं काम ना, करतील त्या. इतके दिवस का मीच होतें ?

**बापू**—बाळुताई असं बोलूं नये.

**बाळुताई**—बरं बरं असं बोलूं नये ! चल येतोस का नाटकाला आपण दोघं जाऊं ?

**बापू**—आईला बरं नाहीं, मी नाहीं नाटकाला यायचा.

**बाळी**—आहा मोठा मातृभक्त ! राणीसरकार आल्या म्हणजे आतां येशील.

**नर्मदा**—वहिनींच्या आई आल्या आहेत, समाचाराला.

**रमा**—आतां खबर कळली वाटतं; हं दे मागल्या पडवीत पाट. मी तेथेंच येतें.

**नर्मदा**—दिला आहे.

**रमा**—ही मी जाते भेटीला.

**बापू**—पण आई तूं कशाला ओलीत जातेस! येथें बोलाव, मी जातो.

**रमा**—सुनेची आई ती, तिला का एवढा माजघर, बैठक, असे चोजले करायचे; कांहीं नको. मीच जाते तेथें. नमु तूं हें सगळें आवरून ये. ( जाते. )

**बापू**—नमुताई मी माझ्या माडीत आहे गरज लागली तर.

**बाळी**—दादटल्या पादटल्या. असला खव्याळ आहे.

**नर्मदा**—असं म्हणू नये बाळूताई! तूं आतां मोठी झालीस. तो तुझा वडील भाऊ आहे.

**बाळी**—अग नाटकाला ने म्हटलं नेलन नाहीं.

**नमु**—आई आजारी आहे, पुन्हा जावें. शिवाय आज घरीं जायचीस ना?

**बाळी**—तें कसलं माझं घर; तें सासूबाईचं, माझं होईल तेव्हां!

**नमू**—असं म्हणू नये, वेळचे वेळीं गेलं पाहिजे. वहिनी कशी वेळचे वेळी येते!

**बाळी**—तीला काम असतं, मी कां करिन? चांगला तीन हजार रुपये हुंडा बाबांकडून घेतला आहे, तो काम कराय करतां कां?

**नाना**—( प्र. ) ताईसाहेब तो आपलें रुप व शिक्षण ह्याकरितां बरें. वहिनी इतकी सुंदर असून दोन हजार घेतलेतच की. तरी घाण्याच्या बैला सारखी सारादिवस जूंपलेली असते. आपण तर गरिबाच्याच घरी आहा. मग नको करायला?

**बाळी**—आली का आपली स्वारी?

**नाना**—हो हो. ही पहा गमत आणली हं. ह्या वेण्या, ही एक तुला. नमुताई, ही तुला.

**बाळी**—आण आण वेणी आणि थांब हां मी आईला विचारतें तुला घेऊन नाटकाला जायचें? ( पळते )

**नाना**—नमुताई ही घे तुला वेणी आणि ही वहिनीला.

**नमू**—अहो मला वेणी काय करायची ?

**नाना**—केसांत घालायची.

**नमू**—कांहीं तरी बोलूं नये हां. माझ्या सारख्या बायका कां वेणी घालतात.

**नाना**—वेडी आहेस, अग बायका मेलेले पुरुष रोज अपटुडेट पोषाखांत जर नटतात तर तुला काय हरकत ? शिवाय तुझं अजून पुन्हां कुमारिका होण्याजोगं वय आहे !

**नमू**—नाना, हा प्रश्न लोकांकरितां नसतो, हा मनाच्या भावनेचा असतो. स्त्रिया शृंगार करतात तो आपलें मन प्रसन्न होऊन पतिचें व्हावें म्हणून पण माझ्या सारिखेंच मन परमेश्वराच्या आराधनेनें खूष होतें. माझ्या रामाला फुलं तुळशी घातल्या कीं मला आनंद वाटतो.

**पद**

चालः—एक्का

**। भक्तीचा अल्प कणही । गमत सुखदा ।**
**। प्रेमाचा तूं सविता । दे प्रेम सदा ॥ धृ. ॥**
**। हे मंगला दावानलीं । रमणि माशा परी ॥**
**। तारि सदया त्वरित । विनति पाया ॥ देवराया ॥१॥**

**नाना**—तूं इतकी वैराग्यशील कशी ग ?

**नमू**—संसाराचें सार वैराग्यांत आहे. पण ह्या संसारात गुंतलें म्हणजे पति, मुलें, बाळें व त्यांच्या ओघानें माझें तुझें ह्या कटकटीमुळें दुसऱ्या बाजूचा अभ्यास करायला फावत नाहीं, म्हणून उमजत नाहीं. माझें तसें नाहीं कर्तव्या पुरतें काम करून उरला वेळ रामप्रभूच्या चिंतनांत जातो, त्यामुळे मनाला शांति समाधान प्राप्त होतें.

**नाना**—किती केलं तरी हें कृत्रीम समाधान ! कारण, खरं आणि खोटं डोळ्यापुढें दिसत असताना, समाधान कसं रहाणार ? पहा, ही सुंदर सुवासिक फुलं, ही काळ्याभोर केसावरच खुलायची, व त्याची शोभा वृद्धिंगत करायची. तें कोणाला नकोसं वाटणार ? घे ही वेणी तूं घाल. त्या सुंदर रुपाला त्यानं शोभा येईल.

**नमू**—हं, जरा दूर उभे रहा, मला ती वेणी नको. मला माझं सौंदर्य वाढवून कोणालाच दाखवायची इच्छा नाहीं, आणि पाठीमागं घातलेल्या वेणीची शोभा मला पुढून दिसणंही शक्य नाहीं, कृत्रीमसा देखावा करून, जगण्यापेक्षां आहे या स्थितींत परमेश्वराचं चिंतन करून शांतिसमाधान मिळवणं मला फार आवडतं. म्हणून म्हणतें, "नाना" माझ्यावर जर तुमचं खर भागिनी प्रेम असेल तर माझ्या पेशाला न शोभणाऱ्या गोष्टींची चर्चा तुम्ही करीत जाऊं नका. हं चला बरं बाजूला, मला आंत जाऊं द्या.

**नाना**—हं, आंत जायचंच आहे, पण मनुष्याचा पेशा कुणी ठरवायचा? वेषावरून ठरवला जात असेल तर वेष बदलावा झालं.

**नर्मदा**—हं, व्हा जरा बाजूला ? मामी वाट पाहतील.

**नाना**—हं, हं, हं, काय पण मामींचं भय ! बरं हा झालों बाजूला. ( नर्मदा जाते ) गेली चटक-चांदणी, काय नुसत पाखरूं आहे पांखरूं ! पण या वेड्या रुढी, आणि आचरट समाज यामुळें ही उन्मूलित पुष्पें आपला आस्वाद रसिकांना न देतां, जागेवरच सुकतात. मनुष्याकरितां परमेश्वरानं जग निर्माण केलं असून मनुष्याच्या सुखा करतां ईश्वरान निर्माण केलेल्या वस्तु माणसांना न मिळतां, न दिसणाऱ्या परमेश्वराच्या पायदळीं पडतात. याला काय बुवा म्हणावं ? आतां ही नमी ! पहा ! कसं अगदीं सुगंधी पुष्प आहे ? पण तिच्या भोंवती तिच्या स्वभावाचं असं कांटेरी कुंपण आहे कीं, जातां येतां वास घेऊं म्हटलं तें तर शक्य नाहीं.

[ प्रभाकर प्रवेश करतो. ]

**प्रभाकर**—आं ! कोण नाना ? नमस्कार, नमस्कार. अं ओटीपासून कोणी मंडळी दिसत नाहींत मी २.४ मिनिटं सोप्यावर उभा राहून मग आंत आलों ! काय सासुबाई बऱ्या आहेत ना ?

**नाना**—अरे, कोणींच नव्हतं वाटतं ? मावशी; मावशी, अहो मावशी; हें पहा कोण आलं ते !

**रमा**—( प्रवेशून ) अग बाई हें काय ? अन् नाना, त्यांना उभेच का टेवलेस ? बसायला तरी दे, खुर्ची तरी आणव ?

**प्रभाकर**—नको, नको कांहीं नको, ही सतरंजीच बरी, या नाना या.

**नाना**---अं हं, अं हं, आणवतो ना मी ! विठू अरे विठू, कुणी नाहीं वाटतं ! थांबा मींच आणतो, तुम्ही जावई बापू ! खालीं कशाला खालीं कशाला ! हें काय अगदीं बसलांतच कां ! बरं बुवा. मावशी हे अगदीं साधे गडी आहेत.

**रमा**—होय हो, बाळूताईच्या स्वभावाला, योग्य स्वभाव मिळाला, तिचं सुद्धां असंच, कुठं ही बलेल बिचारी.

**नाना**—( स्वगत ) आचरट म्हणून !

**प्रभा**—मातोश्रींनीं आपले तब्यती बद्दल विचारायला पाठवलं आहे.

**रमा**—अग बाई, हो का ? किती पण काळजी ! अग बाळूताई.

**बाळूताई**—( बाळूताई लाजत मुरकत प्रवेश करते. बापूहा प्रवेशतो. )

**बापू**—नमस्कार. केव्हां आलांत ?

**रमा**—अरे आतांच हो. अग बाळे, अग लाजतेस काय ? तुझ्या एवढ्याला मुली किती धीट असतात. हं चहा आण जा. आमची बाळी भारीच लाजरी !

**बाळुताई**—मी नाहीं जा. मी जातें, हेंच ना तुझं काम होतं.

**नाना**—वहिनी, अहो वहिनी, जावई बापूंना कांहीं चहा फराळाचं आणतां का ? वा पहा, आमच्या वहिनी आहेतच हुषार, चहा म्हणतांच चहा, बापूराव या तो इकडे. ( लक्ष्मी चहा घेऊन येते, बापू तिचे हातून घेतो. ) ( लक्ष्मी जाते व नर्मदा फराळाच्या तीन बशा घेऊन येते )

**नाना**—अरे बापू, असा भिडस्त कसा तूं ? जावयांच्या हातात दे, घ्या म्हण. हं प्रभाकरपंत मीच देतों तुम्हाला ? मीही थोडासा मेव्हणा आहेच. घ्या चहा करा सुरवात पाहूं.

**प्रभाकर**—( थोडा चहा पिऊन ) खरचं बुवा, आजचा चहा अगदीं फर्स्टक्लास झाला आहे बुवा.

**नाना**—नाहीं, आमच्या वहिनी, तशा आहेतच सुग्रण ? बाकी आमच्या मावशींचीच सगळी शिकवण अं. (बापू विडा सुपारीचं तबक ठेवतो.)

**प्रभाकर**—( उठून ) बरं मी येऊं आतां, आपली प्रकृती बरी दिसते आहे ! मग आईनं सायंकाळीं पाठवायला सांगितलें आहे.

**नाना**—अरे, कोणाला.

**प्रभाकर**—तुमच्या बहिणीला.

**नाना**—असं होय ? मग आतांच नेईनास बरोबर. नाहींतर माझ्या बोकांडी यायचं बरोबर जाऊन पोचवायचं.

**प्रभाकर**—अजून अवकाश आहे. बरोबर न्यायला अजून अवकाश आहे.

**रमा**—बाकी न्यायची असली तर आमची कांहीं हरकत नाहीं हो. टांगा आणायला सांगू का ?

**बाबासाहेब**—( प्रवेश करून ) कोणाला टांगा ? सुनबाईना का ? त्यांची गाडीच यायची आहे. आं कोण प्रभाकरपंत ? आं केव्हां आलांत ? आपली, मातोश्रींची प्रकृति ठीक आहे ?

**प्रभाकर**----हो. मामी आजारी कळल्यामुळं, मातोश्रींनीं भेटायला पाठवलं. बरं येतो आतां.

**रमा**----मग आणायचा का टांगा ? नेणार का जाताना ?

**प्रभाकर**----नको.

**नाना**----मावशी, मी थट्टा केली हो. मी पोंचवीन. होईल, होईल, तेंही होईल, जरा सबूर.

**प्रभाकर**----बरं येतो. ( जातो )

**बाबासाहेब**----हं जावयांना टांगा करून ना देणार होतास नाना ?

**नाना**----छे. त्यांना तर टांगा लग्नांतच दिला. सायकल. पण बाळु-ताईना नेत असेल तर टांगा करून द्यायचा होता.

**बाबासाहेब**--अजून तो नवा आहे ? भेटायला आलेल्या माणसाला मुलगी घेऊन जा म्हणून का सांगायचं ? अगदींच कसं रे तुला डोकं नाहीं ? बापू कपडे कर जा. दादासाहेबांची गाडी येणार आहे, तरी तूं नी सुनबाई जायची तयारी करा.

**रमा**----म्हणजे मला विचारल्याशिवायच का ? नाहींरे जायचं बाप्या ! मी घरांत आजारी, लेकीला बोलवायला त्यांना लाज नाहीं वाटली ?

**बाबासाहेब**—अहो, तुम्ही कांहीं अगदीं अंथरुणांत पडून नाहीं आहांत ! शिवाय नमाताई आहेच.

**रमा**—मला सगळं कळतं हं. पण मी पाठवणार नाहीं, आणि दोघां-नाही एकदम बगींतून तर नाहींच नाहीं. रांडेच्यांनो आपण दोघं जण इथं असतांना गाडीत बसून मिरवत जायला, ती का साहेब मडम आहेत? का वरात आहे?

**बाबासाहेब**—काय रे नाना मघाशीं जावयाबरोबर बाळीला पाठवा-यला तयार झाला होतास, ती वरातच का होती? हें पहा मी दादासाहेबांना हो म्हटलं, त्यांच्याकडे एक मोठे राजे जेवायला यायचे, तेव्हां या दोघांना जेवायला पाठवलंच पाहिजे. बापू चल आटप. लक्ष्मो चल. ( विठू येतो. )

**विठू**—दादासाहेबाकडची गाडी आली आहे, वहीनीसनी नी बापूसाहे-बास्नी न्याया.

**बाबा**—हं आटपा, चला. ( लक्ष्मी दोघांना नमस्कार करते, रमाकाकू पाठ फिरवून बसतात. ) अग रोज जायचं, त्यांत नमस्कार कसला! हं चला आटपा उशीर होतो.

**रमा**--( उठून आवेशानं ) अहो या कवटाळणीनं तुम्हांला मोहिनी घातली मोहिनी. कांहींतरी मेल्यांनीं करणी केली असेल! नाहींतर आजपर्यंत तुम्हीं माझा शब्द मोडीत नव्हतां. या रांडेचीनं साऱ्यांनाच मोहिनी घातली आहे. आतां मघाशींच पहाना? जावई आले तर ही चहा घेऊन पुढेंच भवानी मिरवायला! कुणीं बोलावली सटवीला! घरंदाज घराण्यांतील सासुर-वाशीण ही, बोलावल्या शिवाय परक्या पुरुषापुढं यायचं कशाला? बाळी नव्हती का, पण तिला तिच्या नवऱ्यापुढं येऊं दिलं नाहीं. चहा द्यायला ही, नी पोहे द्यायला तीं मेली अपशकुनी!

**बाबा**—जावयांचा सत्कार तुम्हीं न सांगतां बरोबरच्या मेहुणीनं, बहिणीनं केला, हें चागलंच झालं नाहीं का?

**रमा**—हं, बोलके, काहीं विचार केला आहे का?

**बाबा**—नाहीं, आपल्या संगतीनं साठीच्या आधींच माझी बुद्धी नाठी झाली आहे. हं बापू, लक्ष्मी बाहेर चला. ( बापू लक्ष्मी दोघे जातात. ) नाना बाळीला सासरीं पोंचवून दे. बाळे नाना बरोबर जा पाहूं.

**बाळी**—(प्रवेशून) अं, हूं, मी नाहीं आज जात, मला कंटाळा आला आतां उद्यांच जाईन.

**बाबा**—तें कांहीं नाहीं आतां गेलंच पाहिजे, यजमान बोलावून गेले आहेत.

**रमा**—हें काय बाई, जगा वेगळं, तिच्या मनांत नाहीं, नी म्हणे जा. एकुलती एक पोरगी अन् गेलीच आहे लोकाच्या घरीं ! ती का जन्मभर रहायची आहे ! पण अगदीं निष्ठुर माणसासारखं काय करायचं. नाना सकाळीं पोंचीव रे.

**बाबा**—अं, हं, ही पहिलीच खेप आहे, या खेपेला बोलल्या बोली-प्रमाणें मुलगी गेलीच पाहिजे.

**रमा**—म्हणजे ! तुम्हीं मला आतां कांहींच का किंमत ठेविली नाहीं ? देवा, नारायणा, कायरे या सुनेनं कवटाळ केलं ! हे माझा असा अपमान करूं लागले, नाना चल मला तुझ्या घरीं तरी ने. (जाते)

**नाना**—हां, हां, हां. मावशी ( तिच्या पाठोपाठ जातो. )

**बाळुताई**—अग बाई, बाबा, आई जीव द्यायला जाती आहे हो ?

**बाबा**—जाऊं दे.

**बाळुताई**—मग तुम्हीं नाहीं येत, मीच जातें कशी ? ( जाते )

**बाबा**—हं, चला दिवाणखाना रिकामा झाला. संसारांतलि सभासद पांगले. बा जीवा, कवी लोकांनीं स्वर्गाची उपमा दिलेल्या, पण वस्तुतः ताप त्रयींनीं भरलेल्या या संसाराची संगती कांहीं वेळ सोडून जगांतील, निसर्गाचा आस्वाद घ्यायला बाहेर पड. ( जातात )

---

# अंक दुसरा.

## प्रवेश ३ रा

( बाबासाहेबांच्या घरापुढील जागेंत विठू चंची घेऊन प्रवेश करतो )

**विठू**—आरवा, दिनभर वणवण, आतां कुठं जरा आमची माय-मावली बाहेर गेली आहे, तर घर थंड आहे. नाहीं तर माउलीच्या तोंडाला कंटाळा नाहीं नी आमच्या कानांना बी रिकामपण नाहीं, नी असून तरी करता काय ? धन्य, धन्य त्या बिचाऱ्या दोन्ही पोरींची ! ती नमूताई नी ती वहिनी, दोघी पोरी गरीब आहेत, म्हून मजा आहे. पण म्हण आहेना ! कसायालाच

गाय धारजिणी असती. नायतर अशा या अल्लाप पोरी या बयाच्या घरांत का येत्या ? का आमच्या वहिनींना रूप नव्हतं, का तिच्यां बा जवळ पैका नव्हता ! का जातींत दुसेर मुलगे नव्हते, काय ? नव्हतं काय ? पण नशीब बिचारीचं ! तशी ती नमुताई ! तो साला नाना येतो नी हळू हळू वरचेवर पाटाच्या गोष्टी काढतो. एक सारखं, पुनरियाय, पुनरियाय, पुनरियाय, या लेकाला तिची उठाठेव सांगितली कुणी ? पण दानतच खराब. लयी खराब. फिदी फिदी हंसावं, वाकडं तिकडं नाचावं, मावशी, मावशी करून पुढं पुढं करावं, असं करूनशनी तो आपलं सोंग झाकतोया. येईल, येईल, कधी बी उघडकीला येईल. जाऊं द्या आपनास्नी काय करायचं, आपला मालक चांगला हाय बिचारा, ठीक आहे. आतां वाइच पान तंबाखू खाऊं या नी लवंडू या झालं ! ( पान खात बसतो. ) अरे पन पानच शिलकिंत नाहीं, चला विठूजी, समुरच्या दुकानांतून बिगी बिगी पानं आणूं या, घरांत नमुताई एकटी आहे-

पद

गजल

। बिगि बिगि आणुयां पानाला । जपूं वेळेला ।
। दुग्धावरि जणुं बोका टपला । तसा नीच गमला ॥ धृ ॥
। साध्या भोळ्या सुशील उमद्या । रक्षू ताईला ॥ जपूं वेळेला॥ ॥

---

# अंक दुसरा



## प्रवेश ४ था

[ मागील दारच्या आंगणातील तुलसीवृंदावनापुढें नर्मदा स्तुतीकरीत बसली आहे. ]

नर्मदा—( ईश्वराची स्तुति करते )

पद

मी दिन अबला । वालि न मजला ॥
परि मानसा करित, मी जागृता ॥
हरि ताप जो का । देई सुखाला ॥
आधार विमला । ना मानवाला ॥ १ ॥

हे प्रभो, गोपालकृष्ण अशीच सुबुद्धि कायम ठेव, अशीच धर्मवासना कायम ठेव. मनुष्याच्या चारित्र्याला कायम ठेवणारं शील व नीतिमत्ता, हें सांभाळायचं सामर्थ्य माझ्यांत अखंड राहूं दे. प्रभो, परमात्मा, आपल्या गुणाचं गान करीन. आपलें चरणीं मन ठेवून आपल्याशीं एकरूप होण्याकरितां आपल्या पदीं पोंचण्याकरितां जें जें सामर्थ्य लागतं तें तें मिळूं दे. माझं वय लहान आहे, जग दुराचारी, पापी विचारांच्या माणसांनीं भरलं आहे. तीं आमच्याकडे आपल्याच दृष्टीनं बघतात, तरी अशा पापी दृष्टीपासून, आत्म-संरक्षण करायचं सामर्थ्य माझ्यांत येऊं दे; आणि वेळ पडेल तर, जसं तूं द्रौपदीला साह्य केलंस, तसं मलाही कर. कृपानाथा, कृपासागरा, दीनदयाळा, मी तुला काय बरं वेड्यासारखं विनवते आहे ? असं तुला विनवणं म्हणजे, दीनदयाळ वगैरे तुला मिळालेल्या पदव्या खोट्या आहेत असं होत नाहीं कां ? तुझ्या भक्तांनीं स्वानुभावानं तुला ह्या पदव्या दिलेल्या आहेत. प्रभो...

## पद

( ताल—एका )

**जय जय गोपाला । रे । कृष्णा ।**
**मज भेटसी कधी ? ॥ धृ ॥**
**वेध तुझाच, हृदय हुरहुरे ।**
**रोमांचित मी देह थरथरे ।**
**कंपित अवनी भासे, धीर ना उरे ॥ १ ॥**

अहाहा, या गोपालकृष्णाचं गुणगान करायला लागलं कीं, ऐहिक जगाची विस्मृति होते. भक्तवत्सला, तुझ्या भक्तींत रात्रंदिवस रममाण होऊन रहण्याजोगीं परिस्थिति अद्याप मला नाहीं, म्हणून जेवणापुरतं काम, मला केलंच पाहिजे, म्हणून तुझा हा प्रेमळ सहवास सोडून मी आतां घरांत जाते. ( जवळ असलेली पाण्याची घागर कडेवर घेऊन, वृंदावनाच्या खालीं उतरत एका झाडाला घालते इतक्यांत नाना येतो. )

**नाना**—नर्मदा, या वेळचं तुझं वर्णन करायचं, म्हणजे दुष्यंतानं शकुंतलेचं, जें वर्णन केलं होतं.........कीं,

**पद**

**सख्यांनो द्या सोडोनी । दमली ही पाणि आणोनी ॥**

**.........वगैरे.........**

तशीच तूं यावेळीं दिसते आहेस, आपण आतां दुष्यंत, शकुंतले प्रमाणें एकटीं आहोंत.

**नमू**—हां, हां नाना हें काय बोलतां ?

**नाना**—कांहीं नाहीं, म्हटलं, कालिदासाची शकुंतला कविकल्पित होती, आण्णाची शकुंतला तर्काची होती, पण त्या दोघांची ती एकच असल्यामुळें त्या दोघांनीही तिला कल्पित रूपसंपन्न अशी दाखविली आहे, पण ही माझी शकुंतला कवि कल्पना नसून सत्यसृष्टींतील सौंदर्याचा ठेवा आहे.

**नमू**—नाना, तुमच्या जिभेला कांहीं हाड आहे का ?

**नाना**—पण मी काय गैर बोललों ! हें तुझं लहानपण, यापुढं तुला आतां सगळं वय घालवायचं. ही गोष्ट तुला, मला नी जगाला कळत नाहीं का ? म्हणून म्हणतों देवानं दिलेल्या प्रत्येक वस्तूचा माणसानं उपयोग करून घ्यावा आणि या साठींच, मी तुला सुचवितों, नव्हे विनंति करतो कीं, तूं माझ्याशीं पुनर्विवाह करायचें कबूल कर.

**नमू**—नाना, तुम्हांला अप्रत्यक्ष मी कितीदां सुचवलं, आज पुन्हां सांगतें कीं, पुनर्विवाहाचा प्रश्न समाजाच्या जबरीचा नसून मनाच्या आवडीचा आहे.

**नाना**—अग, पण तुझ्यासारख्या मूर्ख मुलीला स्वतःची आवड-निवड कळत नाहीं ना ?

**नमू**--नाहीं, कळली तर नाहीं ! ती कळवून द्यायचा अव्यापारेषु व्यापार तुम्हांला कुणीं सांगितला ?

**नाना**—अग हित-चिंतक म्हणून. बाकी, नमे, ! खरंच या वेळच्या या रमणीय संध्याकाळीं विलासी जनांना मोद देणाऱ्या या सुंदर संधिप्रकाशांत, उगवत्या चंद्राच्या शीतल प्रकाशांत, एखाद्या प्रेमळ जोडीदार मित्राबरोबर या साऱ्या सौंदर्याचा उपभोग घ्यावा, असं तुला नाहीं का वाटत ! चल, चल,

आपण या तुळशी कट्टयावर जवळ जवळ बसून या चंद्राची शोभा पाहूं. या वेळीं घरांत कोणी नसून आणखी अर्धातास तरी कुणीं येईलसें वाटत नाहीं.

**नमू—**काय हे अमंगळ शब्द! काय हे पापी विचार! दुरात्म्या, भीति लोकांची का असते, कामुका,पुनर्विवाहाच्या गप्पा मारीत मारीत तूं मला अधोगतीला का नेण्याच्या विचारांत आहेस ?

**नाना—**कसली आली आहे गती नी अधोगती ! सारा कल्पनेचा पसारा !

**नमू—**गप्, चुप बस नीचा, सर बाजूला, मला घरांत जाऊं दे.

**नाना—**हातांत आलेलं मधुर पुष्प, हुंगल्या शिवाय का कुणी सोडतं. ऐक, माझं ऐक. घरांत मी मावशीचा लाडका असल्यामुळं, माझ्या येण्या जाण्याचा कुणाला ही संशय येणार नाहीं. तुझा देवधर्म तूं सुरूच ठेव.

**नमू—**शिव, शिव काय मी हें ऐकतें. मनुष्याच्या राक्षसी विचारांची मजल कुठवर जाते, हं, हो, बाजूला.

**नाना—**अहाहा नमू, या आविर्भावांत तर तूं अधीकच खुलून दिसतेस, या संमिश्र प्रकाशांत तर तूं अगदीं हिरकणीच चमकते आहेस.

**नमू—**पाप्या- तीच तचि हिरकणी जीव नाहींसा करायला देखील उपयोगी पडते.

**नाना—**बघूं या बरं कसा जीव जातो तो, हात धरतोच मी. ( तिचा हात धरावयाला जातो, ती उडी मारून तुळशी वृंदावना वर चढते. )

**नमू—**दुष्टा, खबरदार एक पाऊल पुढें टाकशील तर, पापी विचारांनीं भरलेलं तुझं शरीर इकडे येऊं देखील देऊं नकोस.

**नाना—**अग जा. हो, अशा दरडावणीला मी भितो की काय ? इतका वेळ आपला गोडींत पहात होतों. अशा एकांत संधीचा थोडा तरी फायदा घेतल्याशिवाय मी रहातो कीं काय ! कोण येतंय तुझं रक्षण करायला तें पाहूं या. हा पहा मी तुझा हात धरतो.

**नमू—**खबरदार. माझं रक्षण, माझं संरक्षण, गोपालकृष्ण करणार. दीनवत्सल माझं रक्षण करणार, माता, ही तुलसी माता माझं रक्षण करणार.

**नाना—**हें, हें झाड तुझं रक्षण करणार?

**नमू**—होय, होय, हें झाड माझं रक्षण करणार, याच्या आश्रयाला उभं राहिल्यानंतर मला कालिकालाचं देखील भय वाटेनासं होतं.

**नाना**—हें झाड, आहे काय यांत ? हा बघ मी तुझा हातच धरतो. पाहूं बरं कसं तुझं संरक्षण कोण करतं तें ( तुळशी कटयाखालीं उभा राहून तो तिचा हात धरायला बघतो ती तुळशीस कवटाळते )

**नमू**—माते, भगवती, देवी मुलींची अब्रु तूंच संभाळ! गोपालकृष्णा !

**नाना**—( खालून हात ओढायचा प्रयत्न करीत. ) हा, हा बघ तुझा गोपालकृष्ण ! तूं माझी राधा... .....( तुळशी वृंदावनांतून नानाचे बाजूस एक नाग फणा काढून नानाचे आंगावर फूत्कार टाकतो. )

**नमू**—भगवंतानं, माझ्या संरक्षणालाच पाठवला !

**नाना**—अरे बापरे ! साप, साप.

**विठू**—( प्रवेश करून ) या सापाला मारायसाठींच परमेश्वरानं तो साप पाठवला.

**नाना**—( गर्भगळीत स्थितींत-विठूला पाहून ) अरे विठू, अरे, अरे विठू पहातोस काय ? त्या दांडक्यानं साप मार कीं !

**विठू**—( नानालाच दोन चार गुद्दे चढवून ) मानवरूप धारण करणाऱ्या विषारी, जहरी सापा, बोल तुला नुसता बुकलूं कीं, जिवंत गाडूं ?

**नाना**—अरे, तिकडे लोटूं नकोस रे, तो साप चावेल ? विठ्या, विठ्या, तूं आपली पायरी सोडतोस आं, मी मावशींना सांगेन.

**विठू**—जा, जा लेका, साऱ्या गांवांतल्या मावशा गोळा झाल्या तरी मी जुमानीत नाहीं. माय, बहिणीच्या आंगावर हात घालायला शरम नाहीं वाटत ?

**बाबासाहेब**—( प्रवेशून ) अरे सगळे इथं काय म्हणून ? बाहेर घर मोकळं ! आणि, अं......वृंदावनावर सर्प, विठू, विठू...........

**नमू**—( धावत येऊन बाबासाहेबांच्या कमरेस विळखा घालते ) मामा, मामा त्या सर्पाला मारवूं नका, तो माझा रक्षणकर्ता आहे.

**विठू**--अरे, बापरे, केवढा नाग ! याला काय एकट्यानं मारायला छाती होती व्हय ! ( नाग निघून जातो. )

**नमू**—मामा, मामा या मानव देहधारी दुष्ट सर्पापासून, त्या सर्पानं माझं संरक्षण केलं. विठोबा, मामा, तो साप नाहीं, माझ्या गोपालकृष्णाचा तो दूत आहे. माझ्या तुलसामाईचा तो सेवक आहे. परमात्म्याच्या आज्ञेनं, तो माझ्या रक्षणाला धावला, भक्ताला, आस्तिकाला त्यानं हें पटवून दिलं, कीं, परमात्मा सर्वत्र भरला असून, तो कुठल्यातरी रूपानं, भक्तांना संकटमुक्त करतो, भक्त खरा भक्त असला तर देव त्याची उपेक्षा करीत नाहीं. अहाहा गोपालकृष्णा............

## पद

( राग--मालकंस )

**व्यसनीं, मंगलव्रत नित रमणा । व्रत पाला ॥**
**विनवी चरणां, बहुविध तारा भक्त-गणा ॥ धृ ॥**
**रवि-शशि अखिळा उदिता । खुलावि भुवनाला ॥**
**होइन कष्टि, सुखावरि अवनि, शुभ भागा ॥१॥**

**विठू**–व्हय, व्हय, भक्तांच्या संकटासनी देव पावतो. नाहींतर मला कशापायीं बूध व्हावी आंगणांत यायची ? म्हटलं, रात पडली. ताई एकव्याच काय करत्यात, भेव तर नाहीं वाटत ! वाईचं इचारावं ! म्हून आंत आलों. आतमंधी कुणी दिसना कीं साचल लागेना ! म्हून साचल घेत घेत मागील दारीं आलों तवा साप, साप शबद माझे कानी आले. इथं आलों तर हा प्रताप ! पाप्या चंडाळा माय बहिणींना हात लावतांना तुला शरम नाहीं कारे वाटली ? पण गरीब बिचारीचं श्री प्रभूनं रक्षण केलं, तो पंढरीचा इठुबा आहेच तसा दयाळू !

## अभंग

**नको मान-पान, नको मोठेपण ।**
**जाहलो हैराण तुझ्यासाठीं ॥ १ ॥**
**आतां तरी येवो, तुजलागीं कींव, ।**
**तळमळे जीव तूझ्यास्तव ॥ २ ॥**

**बाबासाहेब**—नाना मी काय ऐकतों आहे ? काय रे तुझं चारित्र्य ! विश्वासानं, आपला म्हणून सगळ्या घरांत जी स्वतंत्रता व मोकळीक दिली, तिचा तूं असा कारे दुरुपयोग केलास ! तुला कोणची शिक्षा करूं ?

**नमू**—मामा ! कसली शिक्षा करतां ! त्याला घरांतूनच जाऊं द्या ! जा, जा, लवकर जा, मावशी यायच्या आधीं जा, म्हणजे, झालेल्या सगळ्या गोष्टींचा पाढा मावशींच्या पुढं पुन्हां वाचायला नको. आजच्या गोष्टीनं, तूं जर धडा घेणार असशील, तर झालेला प्रकार आपणाचौघांच्या बाहेर जाणार नाहीं. जा, जा, लौकर जा. ( नाना जातो. )

**बाबासाहेब**—नमू ! कुठल्याही तऱ्हेचं शासन केल्याशिवाय या विषारी सर्पाला तूं सोडलास ?

**नमू**—मामा, एकल्या एकांत जागेंत असल्या विषारी सर्पांना वस्ती करायला जागा सांपडते, म्हणूनच ना, माणसांनीं गजबजलेल्या घरांत, तुमच्या आश्रयाला आलें? मामींचा स्वभाव तेवढ्याकरितां मी सहन करतें ना ? आपल्या प्रेमाच्या सावली खालीं बसून ईश्वर भजनांत मी काळ काढीत आहे ना ? अशा या विषारी सर्पांना डवचण्यांत मजा नसून, आपल्या अपकीर्तींचा मात्र डंका वाजतो. यांना शुद्धीवर आणायला, दया आणि क्षमा हींच हत्यारें उपयोगीं होत.

**बाबा**—अहाहा, विठू पाहिलंस ना ? माझी नमू म्हणजे रत्न आहे ! माझी आक्का आशीच रे होती ! मला वाटतं माझी आक्का पुन्हां बाळ रूपानं मला भेटायला आली आहे. नमूताई, रहा, रहा, रहा. माझ्या जीवनाच्या अंतापर्यंत, माझ्या छायेखालीं रहा.

**रमा**—( प्रवेशून ) अरे विठू, हें आहे काय ? रांडेच्यांनो, घरांत कुणी नाहीं. चूलसुद्धां पेटलेली दिसत नाहीं. ही नमटली गेली तरी कुठं ? कां गेली कुणाचा हात धरून ? दिवसानुदिवस या कारट्यांना लाजाच नाहींत.

**बाबा**—हां, हां जरा जपून बोला अं

**रमा**—म्हणजे आपण इथंच का आहांत ! प्रेमाची मामा-भाची इथंच आहां वाटतं ! मीं काय वाउगं बोललें, रात्र पडली तरी चूल जागीं केली नाहीं ! नी सारीं इथं हवा खात बसलीं ?

**विठू**—कसली हवा बाईसाहेब ? इथं किनयी मोठं जनावर निघालं' त्यासनी माराया आलों. हं चला घरामंदी नमूताई आता पिठल भात करतलि कीं ! ( सारे जातात )

---

# अंक दुसरा

## प्रवेश ५ वा

( प्रभाकराचा घराचा एक भाग. )

**प्रभाकर**—पैशाच्या लोभानं, मी चतुर्भुज झालों खरा, रूपसंपन्न नसली, तरी दहाजणी सारखी आहे, असं पाहून मी लग्नं केलं, साक्षर नसली तरी व्यवहार दक्ष असेल असा मी विचार केला, श्रीमंतांच्या घरीं वाढल्यामुळें, मनाची श्रीमंती तिनें मिळवली असेल असें वाटलें, पण लग्नाला अवघे दोन महिने झाले नाहीं तोंच माझा कयास चुकीचा ठरला. आमच्या संसारांतील भावी सुखस्वप्न आम्हाला आतांच दिसूं लागलीं; असो हरीच्छा.

( बाळूताई प्रवेश करते. )

**बाळुताई**—इरशं हें काय ? इथंच का बसायचं आहे ? मला वाटलं, अभ्यास चालला असेल ! आतां भराभर अभ्यास करून, परीक्षा देऊन टाकावी, म्हणजे एकदां चट्दिशीं मुन्सफी मिळवून, आपल्याला दुसऱ्या गावाला जातां येईल.

**प्रभाकर**—वेडी आहेस झालं ! अशी मुन्सफी वाटेवर का पडली आहे! आणि परीक्षा वेळ आल्याशिवाय का होते !

**बाळुताई**—म्हणजे, इथें मी असे किती दिवस हाल काढायचे ? माझ्यानं नाहीं बाई ही कटकट सहन होत, त्यापेक्षा मी माहेरीच जाऊन रहातें कशी ? मग नोकरी लागल्यावरच येईन.

**प्रभाकर**—वा मोठी शहाणी आहेस तर मग ! नवऱ्यांना नोकऱ्या-लागेपर्यंत मुलींनी सासरीं जायचंच नसतं काय ? तुझी वहिनी कशी रहाते सासरी.

**बाळुताई**—वा, तिची नी माझी बरोबरी वाटत ? तिला आवडतात, तसलीं कामं करायला, तिला माहेरची संवय आहे ? मला नाहीं बाई संवय !

**प्रभाकर**—सवय नाहीं म्हणजे काय ? आपल्या घरांतली कामं करायची सवय केली म्हणजे होते. मनुष्य मात्राला थोडं तरी काम हें केलंच

पाहिजे. कामानं अन्न पचन होतं, शरीर सुटसुटीत रहातं, बरं त्यांतून वेडी वाकडी कामं तुला कोणीच आपल्या घरीं सांगत नाहीं.

बाळूताई—इश्शं, काय बोलतां हें ! इतक्या दिवस काम न करतां राहलें तो नाहीं कुठं वात शिरला माझ्या अंगांत ? काल सासुबाई म्हणाल्या फार चहा पिऊं नये पित्त वाढतें, आजपर्यंत नाहीं झालं कुठं तें ! कांहीं कांहीं दिवस तर मी सहासहावेळ चहा प्यायलें आहे !

प्रभाकर—काय, सहा सहा वेळ ?

बाळुताई—हो सहा सहा वेळां ! माझ्या माहेरचीं कांहीं तुमच्या-सारखे भिकारी नाहींत ! जर एकाद दिवशीं वहिनीनं मी सांगितलेलं माझं काम, नीट केलं नाहीं, तर ते दिवशीं, मी नी आई, दोघी निरनिराळ्या वेळीं तिला चहा करायला सांगून, ५।६ वेळां तिच्या कडनं चहा करवीत होतों, मग तेव्हां नाहीं कुठं तें पित्त झालं ! आतां तुम्हांला चहा साखरेचा खर्च करायला नको म्हणून पित्ताची सबब ! आपल्याला जर एवढी ऐपत नाहीं तर थोरा-मोठ्याची मुलगी करावी कशाला ? मी पिणार मला लागेल तितके वेळ चहा !

प्रभाकर—बरं आतां सकाळचे वेळीं इथं गप्पा मारूं नकोस बरं ? काम कर. आई एकटी काम करीत असेल!

बाळूताई—करीत असतील ! त्यांच्या घरचं काम त्या करीत असतील ! मला काय त्यांचा उपकार ! मी नाहीं असलीं घाणेरडीं कामं करायची .

प्रभाकर—असं म्हणूं नये ! तूं आतां मोठी आहेस, तूं सुन आहेस. तुझी वहिनी जशी तुमच्या घरीं वागते, तस तुला इथं वागलं पाहिजे.

बाळूताई—हो मी बरी वागेन. वहिनी काय मूर्ख आहे, अचरट आहे, तिची माझी का कुठं बरोबरी होईल ? मी नाहीं हो अशी ताबेदारींत रहायची ! माझं अडलं आहे खेटर, असली गुलामागिरी करायला. मी जाईन निघून माहेरी आईकडे. माझी आई समर्थ आहे मला पोसायला. आमच्या वहिनीच्या माहेरचा एक जिन्नस नाहीं मिळत एक जिन्नस कधीं ! पण माझा गळा ओका दिसण्याबरोबर माझ्या आईनं चिंचपेट्या दिल्या पाहिल्यांत ? म्हणून सांगतें, मी साफ काम करणार नाहीं. वाटलं ठेवून घ्या; वाटलं माहेरीं पोचवून द्या.

**प्रभाकर**—असं काय करतेस मूर्खासारखं, ? एकाद्यानं ऐकलं तर काय म्हणेल ?

**बाळूताई**—काय म्हणेल ? नवरा-बायको बोलतात म्हणेल !

**प्रभाकर**—बरं, बरं आतां घरांत जा बरं ! आई बिई पाहील.

**बाळूताई**—पाहिली तर काय झालं ! तीं नव्हतीं वाटतं नवरा-बायको ?

**प्रभाकर**—( जरा रागानं ओरडून ) हं, फार झालं आतां अं, जरा घरांत चला.

**बाळुताई**—नाहीं जात, साफ नाहीं जात, ही अश्शी उभी राहीन, मग काय कराल ?

**प्रभाकर**—बघतों अं आतां, जातेस कीं नाहीं ती !

**बाळूताई**—हें हो काय ! मी नाहीं जात. हें हो काय ? ( असें म्हणत, म्हणत मागं मागं जाते. )

[ पडद्यांतून प्रभाकार अरे प्रभाकर अशा हाका ऐकायला येतात. ]

**प्रभाकर**--आलों, हं आलों ( असें म्हणत प्रभाकर जातो. )

---

# अंक दुसरा

## प्रवेश ६ वा

[ स्थळ--बाबासाहेबांचा दिवाणखाना ]

**लक्ष्मी**—( खुर्चीवर रुमाल सावरते आहे ) ( स्वगत ) काम करते आहे, सगळं कांहीं करतें आहे पण आज माझं मन कशांतच लागत नाहीं ? माझ्यावर आलेला हा घाणेरडा चोरीचा आरोप ऐकला म्हणजे आई, बाबा काय म्हणतील ? दादा काय म्हणेल ? लहानपणापासून इतके कष्ट सोसून मला लहांनाचं मोठं केलं, सुशिक्षण दिलं त्याचं हेंच फळ ? असं त्यांना नाहीं कां वाटणार ? परमेश्वरा तूं दिनांचा वाली म्हणतोस, मग माझा असा छळ कारे चालू आहे ? मला समजूं लागल्यापासून मी कोणचंच पाप केल्याचं मला आठवत नाहीं. असं असतांना तुला भिऊन वागल्याचं हेंच कां बक्षिस मिळावं?

## पद

( भैरवी )

येरे देवा धांवत कालिं या । या कालिं या ॥
खल-खलासी थारा नसे दया ॥ धृ ॥
नाहिं, नाहिं शक्ति सोसाया । येरे देवा झणिं सदया ॥
मम सकल जीवन जाई वाया । दावा चरणा या ॥ १ ॥

**नमू**—वहिनी, वहिनी तूं दिवाणखाना आवरायला म्हणून आलीसना ? आणि येथेंच बसलसि ! मामीनं पाहिलं तर ?

**लक्ष्मी**—वन्सं, कसं करूं ? मला कांहीं सुचतच नाहीं हो, मी अगदीं वेडी झालें आहे हो, मी पेट्या चोरल्या असं समजलं म्हणजे आई काय म्हणेल ? दादा काय म्हणेल ?

**नमू**—अग वेडे ! तुझ्या आई दादाला तुझी परीक्षा नाहीं का ? आज जरी तुझ्यांवर हा आरोप आला असला तरी परमात्मा गोपालकृष्ण कोठल्यातरी आकस्मित रीतीनं तुला खास मुक्त करील.

**लक्ष्मी**—कसला गोपालकृष्ण नी कसलें काय ? माझा नाहीं बाई त्या देवावर विश्वास.

**नमू**—वेडी कुठली. असं म्हणूं सुद्धां नये हो. तो कृपाळू करुणाघन नेहमीं आपल्या पाठीशीं असतोच.

## पद

। नीतिचा पथ दारुण, कितिक म्हणती जन, सत्य भासेहि ना॥
। मनानिं बहरत भावना । कर्मिं वितरत धारणा ॥
। सुकोमल जना, कठिण वाटेच ना, सहज वळवी मना,
निसर्गता जीवना ॥ १ ॥

**लक्ष्मी**—वन्स तुम्हाला तसा तो अनुभव आला, तुमच्या हांकेला तो धावला, म्हणून असं म्हणता. पण आमची तितकी पुण्याई नाहीं म्हणून म्हणा ! हा घाणेरडा आळ आला ना ? चोरी, सासूबाई म्हणतात हिनेंच चोरी केली. सांगा, सांगा वन्स हा आरोप मी कसा सहन करूं ? त्या म्हणतात आणून दे नाहीं तर माहेरीं जा. सांगा वन्स, मी कोठून आणूं.

**बापू**—( प्र. ) नमुताई या वेळच्या तुह्मी येथें उभ्या ना ?

**नमू**—दादा अरे आतांच मी येथें आलें. वहिनीच्या अस्वस्थ मनाला शांत करण्याकरतां जरा दोन शब्द बोलत होतें.

**बापू**—घरांत हव्या तशा गोष्टी घडतात, नी वर मनें अस्वस्थ होतात ! चांगली सोंग.

**लक्ष्मी**—म्हणजे ह्या सगळ्या गोष्टी खऱ्या वाटतात काय ?

**बापू**—अलबत !

**नमू**—दादा, काय बोलतोस ! अरे पतीपत्नी यांना तरी एक-मेकांच्या स्वभावाची माहिती व्हायला हवी ! त्यांनीं एकमेकांची अंतःकरण ओळखायला शिकलें पाहिजे. तुला देखील वाटावें कीं वहिंनीनीं चोरी केली ! म्हणजे आश्चर्य नव्हे का ?

**बापू**—मग माहेरीं ठेऊन आली असेल ? नाहीं तर मग जाव्या कुठें ?

**लक्ष्मी**—काढायचंच कारण नाहीं तर विसरायचं कसं ?

**बापू**—तर मग पेटींनं तर नाहीं खाल्या ? झालं तरी काय ? एकीच्या गळयातला जिन्नस दुसरीकडे कोठें जावा ? काल तुझ्या आईनें तुला कांहीं कारण नसतां बिलवर कां द्यावे ?

**लक्ष्मी**—माझे हात मोकळे दिसतात म्हणून.

**बापू**—आपल्या घरांतले दागिने जातात कोठें ?

**नमू**—बापू माहित असून, डोळे असून, आंधळया सारखें काय बोलतं ? आपल्या घरांतला एक तरी जिन्नस मामीनें तिच्या आंगावर राहू दिला आहे का ? परवांपासून मामींना काय प्रेम पान्हा फुटून त्यानीं तिला पेट्या घालाटला दिल्या देव जाणे !

**बापू**—जिन्नस सांभाळता येत नसेल म्हणून आई देत नाहीं. हें नाहीं का या वरून ठरत ?

**लक्ष्मी**—जिन्नस न का देतना ! ते नकोतच मुळीं, पण हा जिन्नस मी हरवला नाहीं. आंग धुवायला जातांना खुंटीला काढून ठेवल्या, येऊन पाहातें तों नाहींत ! ( स्वगत ) वन्स तीथेंच होत्या पण सासूबाई म्हणतात तिचं बिलकुल नांव नाहीं उच्चारायचं.

**बापू**—हें पहा ! आम्हाला एक दिसतें, त्या तुझ्याशिवाय कुठे गेल्या नाहींत.

**लक्ष्मी**—अरेरे ! आपल्याला सुद्धां मी चोरी केली असें वाटतें ना ? ( रडते )

**नमू**—वहिनी ! वहिनी ! आपलें बहुमोल अश्रू तूं अशा पाषाणापुढं कां फुकट घालवतेस ? तेथें गोपालकृष्णाच्या पायावर तरी घाल. ज्याला स्वतःची बुद्धी नाहीं, विचारशक्ति नाहीं, अशा माणसापुढं स्वाभिमानी माणसानें मुळींच रडगाणें गाऊं नये.

**रमा**—( प्रवेशून ) छे, छे, छे, शर्थ झाली या सटवी पुढें. आतां काय येथें रडण्याचें प्रदर्शन चाललें आहे वाटतं. आतां नवऱ्यापुढं रडगाणं झालं असेल ! ही दुसरी साळसूद भवानी आहेच कीं पाठीराखेपणा करायला. या कवटाळणीच्या पायानंच नाना येईनासा झाला. काय मेली त्याच्याशीं भांडली कीं काय कोण जाणें ! आतां इच्याशीं प्रेम आलें आहे. बाप्या, बाप्या असा बघतोस काय ? झोड, झोड चांगली नी दे हांकलून माहेरी. बोल. बोल ग सटवे कुठं आहेत पेठ्या ?

**लक्ष्मी**—मला माहीत नाहीं.

**रमा**—( तिच्या आंगावर चवताळून जाऊन गालगुचे घेऊन ) माहित नाहीं ?

**नमू**—हां, हां, मामी ! लोकांच्या मुलीला तोंडानीं बोलावं, हात लावूं नये.

**रमा**—सटवे ! तूं कां मला शिकवतेस ? मारीन मारीन, दहादां मारीन माझी सून आहे.

**नमू**—मामाची सून आहे. मामाच्या परवानगीशिवाय तुम्हाला तिला हात लावता येणार नाहीं. मी तुम्हाला हात लाऊं देणार नाहीं.

**रमा**—कशी लाऊ देत नाहींस पाहीन कीं ? ( चवताळून जाते, नमू मध्यें उभी राहून तिचे हात धरून ठेविते ) सटवे खाऊन माजलीस नाहीं ? येऊ देत घरीं कीं दाखवते इंगा. बाप्या, बाप्या, बघतोस काय ? घाल, घाल कीं सटवीच्या पेकटांत लाथ, म्हणजे आतां येतील पेठ्या बाहेर.

[ बापू मारायचा आविर्भाव करतो. ]

**नमू**—हं, दादासाहेब उभे रहा तेथे. खबरदार पुढें याल तर ! भागुबाई सारखं दुसऱ्याच्या चिथावणीनं बायकोला मारायला यायला शरम नाहीं वाटत ?

**बापू**—ताई, ताई तूं दूर हो. दूर हो म्हणतोना ! मला तिला झोडपूनच काढली पाहिजे. अशा चोरट्या बायकोला वठणीवरच आणली पाहिजे.

**नमू**—चोरटी आहे कीं साव आहे तें कळायची तरी तुला अक्कल आहे कारे ?

**बापू**—ताई ! फार वाहवत चाललीस हां ?

**नमु**—पुरुषांची अक्कल वाहावयाला लागली म्हणजे बायकांच्या अकलेला वाचा फुटते. चल वहिनी घरांत आपण आपल्या कामाला लागूं. आतां मामांची गाडी येईल त्यांच्या करतां चहा करूं.

**रमा**—बाप्या, बाप्या ! फुकट रे, फुकट तूं ! नुसतं बायकोला दोन थपडा तुला देववत नाहींत ! नवरा असून बायकोला भीतोस ?

**बापू**—( चवताळून लक्ष्मीच्या अंगावर जायला बघतो. ) ताई ! तूं बाजूला हो, मी नवरा आहे. मी माझ्या बायकोचें हवें तें करीन !

**नमू**—तुझ्या सारखे नवरोबा नी बैलोबा एकाच किंमतीचे. मूर्खासारखी खोटी मातृभक्ती करीत बसतो. ज्याला स्वतःचें कर्तव्य कांहींच कळत नाहीं अशा माणसाशीं वेळ घालवण्यापेक्षां जावं हेंच बरं. ( दोघी जातात. )

**रमा**—बाप्या ! जा आतांच्या आतां जा, नी तिला माहेरीं पोंचवून ये. पेट्या आणल्या तर घरांत घे नाहीं तर नाहीं. हं जा. ( बापू जातो. ) येऊ देत आतां घरीं म्हणजे या नमीची सटवीची धींड बाहेरच काढायला लावते. ( जाते. )

[ बाबासाहेब लहान बॅग व वळकटी घेऊन विठूसह प्रवेश करतात. विठू ब्याग, वळकटी आंत नेतो. बाबासाहेब हुश्श हुश्श करीत खुर्चीवर बसतात. ]

**नमू**—( चहा घेऊन प्रवेश करते. ) गाडी जरा लेट झाली नाहीं मामा ? आतां हा चहा घ्या म्हणजे बरें वाटेल ? मी सांजा करून आणते हं !

**बाबा**—( हंसून वात्सल्य प्रेमानें तिच्याकडे पहात ) नमुताई तूं किती माझी काळजी करणार ?

**नमू**—वडिलांची सेवा करणं हें लहानांचं कर्तव्य नाहीं का ? आक्का कशी तुमची काळजी करत होती !

**बाबा**—आक्का, माझी आक्का ! अहाहा नमुताई, आक्काची आठवण झाली म्हणजे सारें गत आयुष्य आठवतं. तिची शेवटची घटका डोळ्यापुढें दिसते. अखेरच्या वेळीं तिनं तुझा हात माझ्या हातांत दिला तो करुणाजनक प्रसंग माझ्या डोळ्यापुढं दिसतो. " बाबा माझ्या नमुला अंतर देणार नाहींना ? " हें शब्द कानांत गुणगुणतात. नमु, नमुताई या क्षणापर्यंत मी त्या शब्दाला जागलों आहे आणि पुढेंहि जागेन असा भरंवसा वाटतो.

**रमा**—( प्रवेशून ) भरंवसा वाटेल तर काय झालं ! भरंवसा. पुढं पुढं करायला हवं, मामाकडून नाचायला हवं, मोठ्या कळकळीचा आविर्भाव आणून रडायला हवं, जशी कांहीं घरांत कोणी माणसेंच नाहींत. अशा भाचीबाई चहाचा पेला घेऊन नाचता आहेत.

**बाबा**—माणसं पुष्कळ पण कधीं चुलीशीं जाऊन चहा मात्र करींत नाहींत.

**रमा**—आणि लोकांवर दुगाण्याहि झाडींत नाहींत ! ही आपली भाची. ही आज घरांतून बाहेर तरी गेली पाहिजे अथवा मी तरी निघालें पाहिजे.

**बाबा**—हें पहा बाईसाहेब ! तुमच्याशी वाद घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुम्हाला जायचं असेल तर खुशाल जावं. नमू, जायला हवी असेल तर मीहि जातो, कारण तिचं सत्तेच घर देवानें हिरावून घेतल्यामुळं माझ्या घरावरच तिची सत्ता आहे. अर्थात जिथं मी तिथं ती. बोला आम्ही जाऊं कां ?

**नमू**—नाहीं, मामा नाहीं. माझ्याकरतां तुम्ही घर सोडायचं नाहीं. माझें म्हणवलें जाणारें घर जरी मला नसलें तरी माझ्या गोपालकृष्णाचें विश्व मला आहे. जगत्पिता परमेश्वर मला कसा विसरेल ?

**रमा**—अहाहा ! केवढी साधू, केवढी ईश्वर भक्त ! हिचा ईश्वर हिच्यासाठीं म्हणे उभा आहे !

**बाबा**—खरोखरच परमेश्वर तुला विसरणार नाहीं. नमुताई, तो परमेश्वर मला सांगतो आहे कीं, नमुला अंतर देऊं नकोस. बाईसाहेब समजल कां ? मी एक वेळ बाळी दूर करीन पण नमूला नाहीं हो दूर करणार.

**रमा**—छे बाई, हे तर अगदी बहकतच चालले. अहो ती कारटी माझा अपमान करते, मला नाहीं नाहीं तें बोलते.

**बाबा**—चुकली असेल लहान आहे. बाळी नाहीं का बोलत ?

**रमा**—अहो, अगदींच कसे बहकलेत ?

**नमु**—मामी, मी तुम्हांला काय म्हटलें ? लोकांच्या मुलीला मारूं नका, मारावं का हो मामा ?

**बाबा**—नाहीं, केव्हांहि नाहीं.

**रमा**—( वेडावून ) नाहीं, केव्हांहि नाहीं ! तिचीं कृत्यें तरी ठाऊक आहेत काय ? भाची बोलली, आपण बोलले . नाहीं तिला बाहेर घालवींत ठीक आहे. पहातें कशी सटवी बाहेर जात नाहीं तें ! ( जाते )

**नमू**—मामा आपण अग्नी चेतवलात, आतां यांत कोणाची तरी आहुती पडेल.

[ लक्ष्मी व तिचा भाऊ प्रवेश करतो. ]

**गोपाळ**—बाबासाहेब आहेत का ? हा मी गंगूला घेऊन आलों आहे.

**नमू**—वहिनी, ये; आपण घरांत जाऊं ( दोघी जातात. )

**गोपाळ**—बाबासाहेब आम्ही आपल्या पदरीं मुलगी घातली ती चांगली माणसं, चांगलं घराणं म्हणून घातली. त्या बाबत आमची झालेली चूक कमालीच्या सहनशीलतेनं आम्ही सहन केली. पण आतां आज त्याचा शेवट झाला. आजची हकिगत ऐकून बाबांचं डोकं फिरलं, आई रडायला लागली. आजपर्यंत आपण फुटका मणी कधीं मुलांच्या अंगावर ठेवला नाहीं, आणि परवां कोठें कौतुकानें पेट्या घालायला दिल्यात व लगेच चोरल्याचा आळ तिच्यावर घालतां ! माहेरनं पेट्या घेऊन ये नाहींतर जन्मभर तेथेंच रहा म्हणून तिला माहेरीं पोंचवता याचा अर्थ काय ?

( प्रभाकर प्रवेश करतो व नमस्कार करून खुर्चीवर बसतो. )

**बाबा**—तुह्मी काय म्हणतां तें मला माहीत नाहीं मी चवकशी करतों. ( आंत जातात ).

**प्रभाकर**—काय गोपाळराव ! तुमच्या खाजगी गोष्टींत मी विचारूं नये पण कसली चोरी ? कोणाची चोरी ?

**गोपाळ**—तुम्ही त्यांचे जांवई ! तुमच्याजवळ आम्हीं त्यांच्या विरुद्ध कागाळ्या करूं नयेत. पण आतां त्यांच आमचं व्याह्याचं नातंच उरल नाहीं. मग काय प्रश्न उरला आहे. आमच्या गंगूताईला यांनीं परवा पेट्या घालायला दिल्या होत्या त्या तिनें आंघोळ करतांना काढून ठेविल्या, तेथून त्या गेल्या; हीं म्हणतात, तिनं त्या चोरून माहेरी नेऊन दिल्या ! आतां सांगा त्या मुलीनं काय करावं !

**प्रभाकर**—गोपाळराव, तुम्ही जरा थांबा, मी सायकलवरनं एक दहा मिनिटांत येतो ( जातो ).

( गोपाळ उठून फेऱ्या घालतो. बाबासा॰ प्रवेश करतात )

**बाबासा॰**—मी चौकशी केली,

**गोपाळ**—चौकशी वगैरे मी नाहीं ओळखत. हीं सारीं सिद्धसाधकाची सोंगं आहेत. एवी तेवी तुम्ही तिला माहेरी टाकता ! टाका. आह्मी तिला पोसायला समर्थ आहों. पण चोरीचा आळ घालून काय म्हणून ?

**बाबासाहेब**—थांबा मी त्याचा नीट शोध करतों.

**गोपाळ**—करा, लागेल तितका शोध करा. आजपर्यंत त्या गुणी मुलीचा नानाप्रकारें तुम्ही छळ केला. तिच्याकडनं, कुठल्याहि प्रकारचे काबाडकष्ट घेण्यांत कमीपणा केला नाहीं. आमच्या सुशिक्षित मेहुण्यांनीं, आईच्या शिकवणीनं बायकोला हवी तशी छळली. आणि आतां छळाचा कोणताहि प्रकार शिल्लक उरली नसल्यामुळें, अखेरीं माहेरी टाकायला, कांहींतरी निमित्त पाहिजे, म्हणून चोरीचा आळ घातलात.

**बाबासाहेब**—तिला माहेरी कुणीं पोंचविली ?

**गोपाळ**—आमच्या सुशिक्षित मेहुण्यांनीं.

**बाबासाहेब**—बापू ! ( बापू प्रवेश करतो ) लक्ष्मीला माहेरी कां, पोंचविली ?

**बापु**—आईच्या सांगण्यावरून.

[ रमा लक्ष्मीला ढकलीत ढकलीत प्रवेश करते ]

**रमा**—या सटवीला, कोणी घरांत आणली! पेटया घेतल्याशिवाय ही घरांत आली तर मी हिला घरांत घेणार नाहीं.

( प्रभाकर प्रवेश करून हळूंच एका बाजूस उभा राहतो. )

**बाबासाहेब**—अग हो, हो, पण जरा, तोंड राखून बोलावं, जिन्नस गेला असेल, पण तो तिनंच कशावरून घेतला! हें पहा गोपाळराव आमच्या कडचा जिन्नस गेला आहे खरा. पण तो तिनंच घेतला असेल असं म्हणायला कांहीं आधार नाहीं.

**रमा**—हें पहा, या गोष्टी, तुम्हां पुरुषांना नाहीं समजत. असली चोरटी मुलगी ठेवून, मला माझ्या मुलाचा संसार बिघडवायचा नाहीं. मी दुसरं लग्गीन करीन त्याचं!

**गोपाळ**—होय, होय. आम्ही आहोंत समर्थ आमच्या बहिणीला पोसायला. चल, गंगुताई चल, मात्र कोर्टांत फिर्याद करून पोलीसास वर्दी देऊन, या चोरीचा पत्ता मी पाडीन, आणि माझ्या बहिणीवरचा आळ मी घालवीन.

**प्रभाकर**—( येऊन ) गोपाळराव, जरा थांबा. आमच्या सासुबाई म्हणतात तें बरोबर आहे. चोरटया मुली माहेरीच टाकल्या पाहिजेत.

**रमा**—पहा, कसं बरं बोलले! हे पाहिलं कां, ते जांवई असून माझ्या बाजुचं बोलतात. नाहींतर आपण! बाप्या तर अगदीं मुखस्तंभ.

**बाबासाहेब**—मुलगी चोरटी नाहीं आणि चोरटी असली तरी, टाकतां येत नाहीं, ते लहान आहेत म्हणून असं बोलले.

**प्रभाकर**—नाहीं बाबासाहेब, सासुबाईचं म्हणणंच बरोबर आहे. चोरट्या मुली माहेरीच टाकायच्या.

**रमा**—अगदीं, अगदीं खरं बोललांत! देव तुम्हांला उदंड आयुष्य देवो. असल्या या चवचाल कारट्या, सासरीं नांदायच्या कशा? मी माझ्या बापुचं दुसरं लग्न करीन.

**गोपाळ**—अहो, अहो शिष्ट, सगळींच शहाणीं आहां झालं. आम्हांला जाऊं द्या.

**प्रभाकर**—अहो जरा थांबा कीं, सासुबाई, मी सुद्धां तेंच म्हणतों कीं, चोरटी बायको टाकून दुसरी बायको करायची. ही पहा, ही पहा तुमची मुलगी ? हिला मी माहेरी पोंचवायला आणली आहे. आणि आतां मी उद्यांच्या मुहूर्तावर दुसरं लग्न करणार आहे.

[ बाळी प्रवेश करून आईच्या गळ्याला मिठी मारते. ]

**रमा**—काय झालं ! काय झालं बाळीला ? अग, अग पण हो ! अशी रडतेस का ? तूं का रडतेस ?

**बाळी**—मला घरांतून हाकून दिली नी जन्मभर माहेरी रहा म्हणून सांगितलं.

**रमा**—अगबाई. लग्नाची बायको हाकलतांना लाज कशी नाहीं वाटली ? असा अन्याय तरी कोणचा ?

**प्रभाकर**—चोरी, चोरी, चोरी. तुमच्या शब्दाप्रमाणें चोरटी बायको संभाळणं शक्य नसल्यामुळं, तिला मी माहेरी टाकीत आहे. हं गोपाळराव तुमची बहिण चोरटी म्हणून तुम्ही घेऊन जा, माझी बायको चोरटी म्हणून मी ठेवून जातो.

**रमा**—काय ! माझी बाळी चोरटी ? कोण म्हणतं ? हें म्हणवतं तरी कसं ?

**गोपाळ**—तुम्हीं म्हणतां तसं.

**प्रभाकर**—बाबासाहेब या घ्या तुमच्या पेट्या. वहिनी तुम्ही दोषमुक्त आहांत. बाबासाहेब तुम्हा श्रीमंताच्या घरचा हा दागिना जसा मला पचायचा नाहीं तशी श्रीमंताची मुलगीहि खास मला झेपायची नाहीं. अर्थात हीं दोन्ही सांभाळा. गोपाळरावजी थांबवल्याचा तोटा नाहींना झाला ? बापूराव तुझी बायको केवळ रत्न असून तुला तिची परिक्षा झाली नाहीं, पण लाडावलेल्या बहिणीकडे डोळे उघडून पहायला शीक म्हणजे दिसेल. बरं आहे मंडळी, येतों आतां, नमस्कार.

**बाबासाहेब**—प्रभाकरपंत.........

**रमा**—जावाईबापू असं नका हो करूं ! पोरीची जात आहे, माहेरचा जिन्नस गंमत म्हणून, गळ्यांत घालायला, नेला असेल !

**बाबासा०**—नमे, मघाची बोलणारी जीभ मुलीच्या सासूची होती !

**रमा**—तुम्हीसुद्धां हो कसे अगदींच गप्प बसतां ! ती अल्लड आहे. जावयांना दोन शब्द सांगा कीं.

**प्रभाकर**—अं हं ! मला कुणीच सांगायला नको आहे, हं चोरटी बायको मला पत्करायची नाहीं. मी उद्यां दुसरं लग्न करणार.

**रमा**—प्रभाकरपंत, नका हो, असं नका हो करूं. बाळे, पोरी हें तुला कसं सुचलं ?

**नमू**—मामा, इतक्या वेळच्या मामी निराळ्या होत्या ?

**प्रभाकर**—होय. लक्ष्मीला दुरुत्तरं करून, तोच गुन्हा मुलीनं केला असतां, संपादणी करणारी, पहा, पहा " हीच मुलीची–आई " !

**बाबासाहेब**—अगदीं खरं. म्हणूनच प्रभाकरपंत मी, बाप या नात्यानं आपल्याला विनवितों कीं, आम्हांला पदरांत घ्या.

**लक्ष्मी व नमू**—आम्ही दोघी देखील तेंच म्हणतों.

**बापू व गोपाळ**—प्रभाकरपंत आह्मीहि क्षमेची भिक्षा मागतों.

**प्रभाकर**—आपलं म्हणणं मी मान्य करीन, पण तें एकाच अटीवर. सासुबाईनीं ती अट कबूल केली पाहिजे.

**रमा**—माझे डोळे चांगले उघडले; तुम्ही म्हणाल तें मला कबूल आहे.

**प्रभाकर**—तुमच्या मुलीला आमच्या घरीं पाठविली तर लक्ष्मी बहिनीना तुम्ही तिच्या जागीं समजलं पाहिजे.

**रमा**—एवढंच ना ! हात्तेच्या; ये, सुनबाई ये, आजपासून तूंच माझी बाळुताई अं.

**बाबासाहेब**—अहाहा ! आज सोन्याचा दिवस उगवला. संसार सुखाचा झाला.

**नर्मदा**—कां वहिनी ? भक्ताला देव पावतो कीं नाहीं ?

**लक्ष्मी**—होय, होय वन्स. पावतो, पावतो बरं.

**नमू**—तर मग या आनंदाच्या प्रसंगी आपण एक गोपालकृष्णा गुणगान करणारं सुंदरसं गीत गाऊं या..........

## पद

कोरस

। दे प्रभो धर्मप्रेम सकलां । चरणीं विनवणी
दे प्रभो धर्मप्रेम सकलां ॥ धृ ॥
। भारतीं बहुता सती । चिरकालीं देई सन्मति ॥
सौख्य शांती जगीं अखंड विलसो । तुज नमिता ॥ १ ॥



# सौ. गिरिजाबाई केळकर यांचीं

## प्रकाशित पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | गृहिणी भूषण भाग १ किंमत | ०-८-० |
| २ | गृहिणी भूषण भाग २ | ०-८-० |
| ३ | समाज चित्रें | २-०-० |
| ४ | केवळ विश्रांतिसाठीं | १-०-० |
| ५ | स्त्रियांचा स्वर्ग | १-८-० |

ही पुस्तकें मुंबई [illegible] यांनी तयार केली आहेत.

---

## नाटकें

| | | |
|---|---|---|
| १ | पुरुषांचें बंड | ०-१०-० |
| २ | आयेषा | ०-१२-० |
| ३ | राजकुंवर | १-०-० |

याशिवाय सतीप्रभाव अथवा सावित्री हें रंगभूमीवर आलेलें नाटक छापत आहे.

पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें——

| धुळें — | मुंबई— |
|---|---|
| खानदेशवैभव छापखाना धुळें गल्ली नं ६ | परचुरे पुराणिक आणि मंडळी माधवबाग [illegible] नं ४ |